# पांढरा चाफा.

[ लघुकथा--संग्रह. ]


लेखकः—

शंकर कृष्ण करंदीकर,

बी. ए; एल् एल्. बी.

वकील, कल्याण.



—: जून :—

१९४०


किंमत ═══ १२ आणे. ═══ किंमत

# अनुक्रमणिका.



कथानुक्रम.

# परिचय.

'गांढरा चाफा' या लघुकथात्मक प्रथम वाङ्मयापत्याचा मी वाचकांना व रसिकांना परिचय करून द्यावा अशी मित्रवर्य करंदीकर यानीं इच्छा प्रदर्शित केल्या वरून मी हें मित्रकार्य करीत आहे. ख्रिस्ती लोकांत धर्मपितृत्वाची एक रूढी आहे. तिचा दुसरा कोणताही हेतु असो, आपल्या स्नेह्यांत आपल्या अपत्याबद्दल स्नेहबुद्धि निर्माण व्हावी ही कल्पना त्यांत असावी, असें मला वाटतें. आपल्याकडे आपल्या वाङ्मयापत्याबद्दल, निदान प्रथम अपत्या बद्दल तीच भावना असणारे चार स्नेही सोबती असले तर अवश्य असावेत, अशी होतकरू लेखकाला इच्छा असते. आपल्या डोळ्यासमोर कांही प्रसंग घडत असतात आणि ते लोकांना सांगावेसे वाटत असतात. त्या करितां करावा लागणारा विचार आणि त्यांना सजविण्याकरितां करावी लागणारी खटपट लेखक आपल्या शक्त्यनुसार करित असतो. पण कांही झालें तरी लेखनाची ही अगदी प्राथमिक अवस्था असते. संसारांत दिसणारे, अनुभवाला येणारे प्रसंग लक्षांत घेऊन त्यांतून नित्य स्वरूपाचे प्रश्न, सार्वकालिक स्वरूपाच्या घटना निर्माण करण्या इतकी कल्पनाशक्तीची वाढ होण्यास प्रथम कृतींतील गुणदोषाची जाणीव आपलेपणानें करून देणाराची आवश्यकता असते. मात्र या मार्गदर्शकाकडून मिळणाऱ्या उत्तेजना प्रमाणेंच त्यानें केलेल्या निराशेला सुद्धां तोंड दिल्या शिवाय लेखकाला पुढील मार्ग अक्रमतां येत नाही, हें त्यानें लक्षांत ठेवावयास पाहिजे, 'मी लीहीन तें वाचावयास व त्याचा विचार करावयास लावीन,' असें बजावणाऱ्या लेखकाच्या मागें निराशेची, निरूत्साहाची हेटाळणीची तपस्या असते, हे विसरतां येत नाहीं. श्री. कृ. प्र. खाडीलकराचें अगदीं

पहिलें, विविधज्ञान विस्तारांत छापलेलें, 'सवाई माधवरावांचा मृत्यू' हें नाटक अगदींच सामान्य प्रतीचें आहे. परंतु 'महाराष्ट्र नाटक मंडळीनें बसविलेलें सध्यांच्या स्वरूपांत दिसणारें तेंच नाटक म्हणजे वाङ्मयाचा व नाट्यकलेचा एक उत्कृष्ट आदर्श आहे. त्यांतील कांहीं ऐतिसिक प्रसंगां-वरून खाडीलकरांवर शिव्याशापांचा भडिमार झाल्यामुळे त्यांचा वाटा प्रस्तावनालेखकाला नको म्हणून खाडीलकरांनीं स्वतःच ती प्रस्तावना लिहून, त्यांनीं तिच्यांत तसा उल्लेख मुद्दाम केला आहे. त्याच्या उलट मुदाम्याच्या पोह्याच्या मुठींच्या मुठी नियतकालिकांतून वाचकांवरून उधळून त्या पुनः संकलित स्वरूपांत मांडतांना श्री. न. चिं. केळकराक-डून फुंकून त्या रसिकांना अर्पण करण्याला कै. श्री. कृ. कोल्हटकर विसरले नाहींत. पण मौजेची गोष्ट अशी कीं आपल्या आक्षेपकांना त्यांनीं दिलेलं उत्तरही त्यांत संकलित केलेलें आहे.

लघुकथेच्या तंत्रांत अनेक गोष्टी महत्वाच्या असतात. प्रसंगाची निवड, सार्वलौकिक अनुभवाला रुचेल अशी त्याची मांडणी, प्रसंगाचें कारण, विस्तार आणि परिणति यांचा तर्कशुद्ध विकास, वाचकाच्या भावनांना चालना देताना त्यांच्या अपेक्षा सफल होऊं देतां देतां अनपेक्षित आणि संभवनीय परिणति करणें इत्यादि प्रमुख गोष्टीवर कथेचें, लघुकथेचें किंवा कोणत्याही ललित वाङ्मयाचें यश अवलंबून असतें. वाचकानें आपल्या लेखनाकडे पुनः पुनः वळावें अशी इच्छा असेल तर या शेवटच्या गोष्टीकडे लेखकानें अवश्य लक्ष द्यावयास पाहिजे. या दृष्टीनें ' पांढरा चाफा ' या संग्रहांतील लघुकथा बऱ्याचशा यशस्वी झाल्या आहेत असें मला वाटतें. उपवर मुलीची निवड, गरीबाचा संसार, नवा वकील, कृपण मनुष्य, संसारांतले अनपेक्षित योगायोग, दैवदुर्विलास, आणि भिकाऱ्याचें एक सामान्य दृश्य या गोष्टी आपण जगांत सामान्यतः पहातोंच. पण लेखकाच्या अभिरुची-प्रमाणें त्यांची मांडणी वेगळया प्रकारानें होतें. श्री. करंदीकरांनीं या

प्रसंगांना दिलेलीं नांवें रहस्यमय आहेत. ‘ लवंगा राहिल्या, वेलदोडा उडाला, ‘ श्रीमंतांच्या मुलीचें लग्न, ’ ‘ पहिलाच पक्षकार गळ्यांत पडला, ’ ‘ कारंजें, ’ ‘ परीक्षा झाली, ’ हीं लघुकथाचीं नांवें व ‘ पांढरा चाफा ’ हें ह्या संग्रहाचें नांव, हीं या दृष्टीनें खरोखर चांगलीं साधलीं आहेत. त्यांतील सूचकतेमुळें तीं रहस्यमय झाली आहेत. वधूपरीक्षेचा कार्यक्रम किती खेळीमेळीनें व्हावयास पाहिजे ! पण अनेक ठिकाणीं अपयश येत असल्यानें व नित्य तसा संभव असल्यानें हें समारंभ उसन्या हास्यानें साजरे होतात. पहिल्या कथेंतला वधू परीक्षेचा समारंभ वधू पित्याच्या विनोदानें साजरा झाला व त्याला उचित असा मथळा त्या गोष्टीला मिळाला आहे आणि वाचकांच्या अपेक्षेला धक्का बसला असला, तरी तो तसाच बसत रहावा असें उसन्या हास्याला कंटाळलेले वाचक खास म्हणतील. दुसरींतील परस्पर विरोधी वातावरणाची पार्श्वभूमी करुणरसाला भरतीच आणते. श्रीमंताच्या घरातील लग्नसमारंभ आणि गरीबाच्या घरातील आजार, पहिल्यातील वैभव व दुसरीकडचें दारिद्य, एकीकडे तोंडांतून शब्द निघण्याचा अवकाश की, सर्व कांहीं हात जोडून आज्ञा पार पाडण्यास तत्पर तर दुसरीकडे दिसणारी आवश्यक गोष्टींची वाण आणि असहाय्यता, मनाची कालवा-कालव करतात. तिसऱ्या गोष्टींतील घटना साधी असली तरी अनोळखी वकील आणि पक्षकार यांच्या पहिल्याच भेटींत तिचा आनंदपर्यंसायी शेवट होण्या इतकें जोरदार कारण उपयोजिण्यांत या कथेनें यश सामावलें आहे. ‘ कृपणाचें औदार्य ’ हा विरोधच फार रहस्यपूर्ण आहे आणि त्याचा उलगडा चांगला साधला आहे. संपत्तीचा व्यय जीवनाच्या आवश्यक गोष्टींकडे सुद्धा न करणारा मारवाडी, संपत्तीचा अपरिहार्य नाश पाहून उदार होतो हें ‘ कारंज ’ या कथेंतील दृश्य आहे. एका अनोळखी परंतु संकटांत सांपडलेल्या मुलीला मोटार अपघातांतून

वांचविणारा वसंत त्याच मोटारीखालीं सांपडतो व मॅट्रिक परीक्षेऐवजीं आपल्या धैर्याची व जीवनाची परीक्षा उत्तीर्ण होतो ! त्याची आई मात्र बिचारी असहाय्य होते !!! ' भणंग भिकारी ' हा उपरोधपूर्ण विनोदी लेख आहे. नवमतवादी व सनातनी या दोघावरही या भिकाऱ्याच्या दृश्यांतील प्रसंगानीं लेखकानीं शरसंधान केलें आहे. पण ते बाण दोघेही हसत हसत स्विकारतील.

श्री. करंदीकराच्या लघुकथा वाचून त्यांचा जगाकडे पहाण्याचा एक वेगळा दृष्टिकोन आहे ही गोष्ट लक्षात येते. तो म्हणजे संसाराकडे हसत खेळत पहावें हा होय. एकतर दुःखाचे सुस्कारे टाकावे, उदासीन व्हावे, आपल्या दीन परिस्थितीबद्दल कोणावर तरी सडकून रागवावें; नाहींतर आहे त्यावर चैन करावी, मग त्यात कोणाची मान मुरगळावी लागो, नी ति चुरगळावी लागो, आपले यथास्थित चालल्याशीं काम, अशी वृत्ति जगात सध्यां दिसून येते. ' वाचकाना आवडतात तशा गोष्टी आम्हाला लिहिणें भाग पडतें, ' असें म्हणणाराच्या वर्गात श्री. करंदीकराचा अंतर्भाव होत नाहीं. कामुक वृत्ती जागृत होणारा शृंगार कथातून आणून आणि त्यावर 'कलेकरिता कलेचें,' 'वस्तुवादर्शी चित्राचे,' 'अनुभवाच्या बोलाचे' आवरण घालून असदभिरुचि निर्माण करणाऱ्या वर्गात प्रस्तुत लेखक मोडत नाहीत. एक प्रकारच्या सहानुभूतीनें आणि निकोप विनोदी वृत्तीनें त्यांनीं आपले लेखन जगापुढे मांडले आहे.

त्याच्या गुणाचा परिचय करून देतांना त्याच्यांत आढळून आलेल्या उणीवाचा उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. या लेखनावर सफाईचा हात फिरावयास पाहिजे होता असें मला वाटते. आपण बोलतों तसें लिहिण्याचा प्रघात हल्लीं पडूं पहात आहे. पण बोलतांना सोईच्या दृष्टीनें ती आपण बोलतों, शुद्धाशुद्धतेकडे न पहातां बोलतों. लेखनांत ही जर आपण तिच्या शुद्ध स्वरूपाकडे न पाहिलें तर मला

वाटतें भाषेला कोणताच निर्बंध राहणार नाहीं. व्यक्तीपरत्वें भाषा होईल. या पुस्तकात एक वचनी नामाला तृतीयेचा बहुवचनी प्रत्यय लागला आहे, 'कारंज 'हा शब्द पुल्लिंगी वापरला आहे. पृष्ठ १२ वरील एक वाक्य वाचून लेखकानी बिचाऱ्या गायकाच्या हातात बागड्या का भरल्या ? असा प्रश्न वाचकांपुढे येऊन पडेल. पण फोनोच्या प्लेटीं बद्दल म्हणजे तबकड्याबद्दल तो शब्द लेखकानी वापरला आहे असें वाचकाना आढळेल. पहिल्या कथेत 'शकू,' 'नलू' आणि 'कुमुद' यांच्या गुणरूपाच्या वर्णनाला वाव देऊन दिवाणखान्याच्या वर्णनांत काटकसर केली असती तर 'वेलदोडा' का 'उडाला' हें वाचकाना कळलें असतें. वैय्यक्तिक हेकटपणा, बोलण्या वागण्याच्या लकबी आणि स्वाभाविक दोष हे विनोदाचे विषय होऊं शकतात. कारण त्याचे निराकारण व्हावें असा विनोदाचा हेतु असतो. परंतु नैसर्गिक आणि परिस्थितीजन्य उणीवाकडे हास्य उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें न पहाणेंच बरें. होतकरू वकील वसंतरावाबद्दल कांहीं विनोदी वाक्यें बोचक वाटतात तशी ती आली नसती तर बरें झालें असतें. संततीनियमाबद्दलचे आलेले शेवटच्या लेखातले उल्लेख दुसऱ्या एका दृष्टीनें निरर्थक आहेत. टाइम्सनें फ्रान्सच्या पाडावाच्या बाबतीत लिहिलेलें एक वाक्य संततीनियमनाचा फोलपणाच नव्हे तर भयंकरपणाच सिद्ध करीत आहे. इतकेंच नव्हे तर भिकाऱ्यांची प्रजा वाढली आणि उद्योगी लोकाची संतती घटली तर काय होईल, याचा वाचकांनी विचार करावा. लेखकाच्या इतर गुणदोषाबरोबर सूचक वर्णनशैलीचा उल्लेख मला केला पाहिजे. सर्व गोष्टी विचारांत घेऊन श्री. करंदीकरांचा हा प्रथम प्रयत्न उत्तेजनार्ह आहे असें मी म्हणतो. त्याना आपल्या लेखनांत यश येत राहो असें मी इच्छितो.

कल्याण.
२६ जून १९४०

वा. ह. घारपुरे.

# नांवांत काय आहे ?

साहित्यक्षेत्रांतलें हें माझें पहिलेंच पदार्पण. साहाजिकच, अंतरंगाची परीक्षा सहानुभूतीचा चष्मा लावून वाचकानीं करावी इतकीच विज्ञापना आहे. दोषांकडे दुर्लक्ष बुद्ध्या करावें असा मात्र हेतु नाहीं.

संग्रहाचें नांव दिशाभूल करणारें आहे असा आरोप माझेवर करण्याचा मोह काहींना अनावर होईल. कारण पुस्तक प्रारंभापासून विश्रांतीपर्यंत उलटलें तरी ' पांढरा--चाफा ' कोठेंच आढळत नाहीं ! या करतांच, कोणत्या हेतूनें, 'पांढरा चाफा ' आधाराला घेतला आहे, त्या बद्दल खुलासा करणें अपरिहार्य झाले आहे.

बारशाचेवेळीं मुलाला नांव ठेवतांना, त्याचा उर्वारित जीवनपट भविष्यकाळाच्या पेटींत बंद असल्यामुळें सुंदर नांव ठेवून आई बाप मोकळे होतात ! पुढें, प्रत्यक्ष त्याच्या आयुष्याचें चित्रण, ठेवलेल्या नांवाशी एकदम विसंगत झालें तरी, नाव ठेवणाऱ्या आई बापांना कोणीच नांवें ठेवीत नाहीं कारण, भविष्याच्या पोटांत कोणीच शिरू शकत नसल्यामुळें, बाळानें, ठेवलेल्या सुंदर नांवाची पर्वा न करतां, गुण उधळले तरी त्याचा दोष आई बापांच्या पदरीं कोणी बांधीत नाहीं.

परंतु, संग्रहाला नांव ठेवतांना, वस्तुस्थिती अगदींच वरच्या उलट ! अंतरंग तयार झाल्यावर, त्यावर नांवाचा शिक्का मारण्याचें काम एकदम अवघड आहे ! कारण, अंतरंगांतील गुणावगुणांची तमा ओळखून नांव ठेवावें लागतें. त्याकडे डोळेझांक करून नाव ठेवलें तर, उघडाउघड, जन्मांध कन्येला सुलोचना म्हटल्या इतकें हास्यास्पद होईल ! अर्थात् प्रगट न झालेल्या गुणांचा टिळा कपाळीं मारून पुस्तकास नांव ठेवणें जसें इष्ट नाहीं तसेंच, विनाकारण फाजील विनयाला बळी पडून कमीपणा पत्करून आपल्याच पुस्तकाला आपण नांव ठेवणें हेंही इष्ट नाहीं. या दोही दोषांची सीमा ओलांडून, अंतरंगाच्या गुणानुरूप, नामकरण करणें अवघड म्हटलें तें या करतांच.

चाफ्यांमध्यें, पांढराचाफा, पिवळाचाफा आणि हिरवाचाफा अशा तीन जाती एकापेक्षां एक अधिक सरस व गुणवंत आढळतात.

साहित्यदेवीच्या चरणीं ही पहिलीच पुष्पांजली मी वाहात आहे. त्यामुळें, दोषांची जाणीव पूर्णांशानें ठेवून, गुणानुक्रमानें शेवटच्या पायरीवरचें म्हणजेच पांढऱ्या चाफ्याचें फूल, वाहाण्याची कुवत माझ्या कलमांत आहे असा भावार्थ संग्रहाला ‘ पांढरा चाफा ’ संबोधण्यांत आहे. ही सेवा, रसिकवृंदानी गोड मानून मला उत्तेजन दिलें तर यापुढें वासारंगांत मोलानें निसंशय श्रेष्ठ असणाऱ्या पिवळया-

चाफ्याची ओंजळ अर्पिण्याची व त्या पुढली पायरी म्हणजें, गुणश्रेष्ठ हिरव्या चाफ्याची अंजली अर्पिण्याची महत्वकांक्षा मी बाळगीत आहे ! ही आकांक्षा सफल होणें वाचकाच्या प्रोत्साहनावर अवलंबून आहे.

'कारंज' या कथेत मथळयातच हिमालया एवढी चूक व्याकरण दृष्टया झाली आहे ! ती गार्धीजींच्या इतक्याच मोकळया मनानें कबूल करण्याचें धैर्य मी दाखवूं इच्छितो ! उल्लेखनीय अशी ही एकच चूक असली तरी दुसऱ्या असख्य चुका असण्याचा संभव आहे. त्या या मोठ्या चुकीच्या पोटात सहज समावूं शकतील म्हणून त्यांचें निराळे प्रदर्शन करीत नाहीं !

सुदैवानें वर सूचित केलेली महत्वाकांक्षा रसिकाच्या कृपेमुळे, सफळ झाल्यास या पुस्तकात व्याकरण दृष्टया राहिलेला ढिलपणा व इतर चुका याची पुनरावृत्ति होणार नाहीं असे आश्वासन देऊन ठेवतो.

प्रथम प्रयत्नाचा, मार्मिक गुणदोष चर्चेने युक्त असा परिचयात्मक गौरव करून मला उपकृत केल्याबद्दल माझे मित्र श्री. वा. ह. घारपुरे एम्. ए. याचे मनःपूर्वक आभार-मानून प्रस्तावना पुरी करण्याची परवानगी घेतो.

२६ जून १९४०
रणछोड निवास,
आग्रारोड–कल्याण.

लेखक—

**शं. कृ. करंदीकर.**

# लवंगा राहिल्या, वेलदोडा उडाला !



लग्नाचा मोसम ऐन भरात होता. अनेक ठिकाणी, दाराना केळी लागलेल्या दिसत होत्या. ताशेवाजंत्र्यांचा सूर ही दिवसभर कानावर आदळत होता॰ परंतु केळीचे खांब लावून, मांडव उभारण्याची इच्छा असूनही कांहींच्या परीक्षा अजून उतरत नवत्या त्यांच्या घरीं, दाखविण्यांचेच समारंभ अधुन मधुन चालले होते ! आप्पासाहेब कीर्तनाच्यां घरी हीच धामधूम आज उडाली होती. ह्या धामधुमींत आनंद होताच परंतु निर्भेळ मात्र नव्हतां ! परीक्षा व्हावयाची, म्हणजे निकालाची काळजी ओघानीच आली. यामुळें, आप्पासाहेबांच्या घरातल्या आनंदाभोंवती काळजीचं पुसट कडं उमटलेलं होतं.

दिवाणखाना मोहक होता. आईलपेंटची तकाकी अद्याप कायम होती. बैठक सुंदर गालीच्याची असून मध्यभागी मोराचा गालीचा घातला होता. सुखासन म्हणून लोड ठेवले होते. आजूबाजूला पाहिलं तर, नव्या जुन्या मतांच मधुर मिश्रण, चित्रांच्या पसंतीवरून दिसून येत होतं. रविवर्माची लांबलचक रंगित चित्रें, दृष्टिला तितकीशी मोहवींत नव्हती. परंतु शेजारींच, आजकालच्या विख्यांत असणाऱ्या नटींचीं चित्रें लावून, चित्रकलेचे व सौंदर्याचे दोन नमुनेच अभिप्रायांकरतां पुढे मांडल्यासारखे वाटत होते.

उष्मा फार होत होता त्यावर उतारा म्हणून डोक्यावर विजेचे पंखे, वेगाने फिरत होते. दिवाणखाण्याच्या एकंदर ठेवणीवरून मालकाची

संपन्नतां तेव्हांच लक्षात येई. पैशानी मिळणारीं सारीं सुखं खरिदण्याची अनुकूलता मालकाला असावी व तशी खरेदून उपभोगण्याइतकी रसिकताही त्याचे ठिकाणीं असावी असा कयास बांधला असता तो चुकीचा ठरला नसता. कारण अप्पासाहेब कीर्तने मोठया पगाराचे सरकारी नोकर होते. मोठया पगाराइतकांच मोठा मानही त्याना सुखवीत होता. पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटच्या हुद्यावर असल्यामुळे ऐहिक वैभवाची शीग त्यानी गांठली होती !

ज्याच्या करता दिवाणखान्याचा शृंगार आज कळसास पोचविला होता ते, म्हणजे एक तडफदार अद्यावत् पोषाखानी अधिकच खुलून दिसणारा मिशीविना तरुण व बरोबर त्याचे दोन मित्र असे तिघें तरुण आताच दिवाणखान्यात येऊन बसले. मुलगी नव्हे, मुली पाहण्याकरताच या स्वाऱ्या आल्या होत्या हे त्यांच्या निष्काळजी आनंदी सस्मित चेहऱ्यावरून ताडता येत होतें.

ज्या कामाकरता ही पाहुणे मंडळी आली होती ते उरकून घेण्याच्या उद्देशानी अप्पासाहेबानी, मुलींना आणा असा इषारा खुणेनी घरात दिला. मालकाचा हुकूम होतांच तीन उपवर मुली त्या पाहुण्यां समोर येऊन, त्यांना नमस्कार करून बसत्या झाल्या. एकदम तीन मुलीं का प्रगटल्या अशी शंका कोणी विचारील. पण त्याचं उत्तर म्हणजे थोडा इतिहासच होईल. सामुदायिक हळदीकुंकवाचे समारंभ खर्चाच्या सोईकरता, करण्याची प्रथा पडत चालली आहे, त्याप्रमाणेंच मुली दाखविण्याचा समारंभ, एकापेक्षा अधिक गरजूंनी एक होऊन करावयाचा पायंडा पाडण्याची

कल्पना असावी? असाही तर्क कोणी करील. परंतु दिवाणखान्यात आज होणारा समारंभ हा एकट्या अप्पासाहेबाचा होता इतकच सांगितलं म्हणजें तर्क वितळून जातील असा भरवसा आहे !

पाहुण्यांनी ठराविक साच्याचे, नाव वय वगैरे बद्दल प्रश्न विचारलें. वाचनाचा समारंभही उरकला. मुलींची परिक्षा आटोपली. त्याना जा म्हणून सागण्यात आलें. जाण्यापूर्वी पेढ्याचे पुडेही सर्वांच्या हाती देण्यात आले.

औपचारिक रिवाज म्हणून पाहुण्याना पान घेण्याचा आग्रह झाला. व पाहुण्याचं स्वागत यजमानाने जातीन करण्याचा एक शिरस्ता म्हणून, लवंग वेलदोडा पाहुण्यांच्या हातात देण्याकरता तबकांतली डबी अप्पासाहेबानी बोलत बोलतच उघडली. डबी उघडून पहातात तो काय ? त्यात वेलदोडयाचा दाणाही शिल्लक नाहीं ! आपल्या हातानी आपण डबींत लवंगा भरल्या तसेंच वेलदोडेही भरले याची आठवण होऊन अप्पासाहेब उद्गारले, " काय करणार या पोराना ! डबींतले वेलदोडेच तेवढे पळविलें, लवंगा पहाव्या तर कायम ! " अप्पासाहेबाच्या ह्या विनोदाचं, पाहुण्याना हसून स्वागत करणेच भाग होते. त्यानी स्मितानी अप्पासाहेबांच्या या मार्मिक उद्गाराची री ओढला.

तबकातल्या डबीनी केवढा सिद्धांत अप्पासाहेबाच्या तोंडून वदवला होता ! मुलींच्या दाखविण्याचा समारंभ झाल्यावर दोन दिवसांनीं, पाहुण्यांकडून सर्वांत धाकटी कुमुद पसंत असल्याचा

निरोप आला ! तिच्याहून थोरली नलू नापास व नलूहूनही मोठी शकू ही पण नापास ! हा परीक्षेचा निकाल ऐकून अप्पासाहेबाच्या एका थट्टेखोर मित्रानी टोला मारला "लवंगा राहिल्या, वेलदोडा उडाला !"

लवंगा का राहिल्या ? काळ्या व तिखट म्हणून ! वेलदोडा का उडाला, रंगदार, सुवासिक व चविष्ट म्हणून ! जगात हेच तत्व हरघडी प्रत्ययाला येत !



# श्रीमंतांच्या मुलीचं लग्न !



पोकळ--पुरा आज आनंद--सागरात बुडाल्या सारखा झाला होता. कारणही अगदी उघड होतं. जहागीरदारांच्या इथं फारा वर्षांनी कार्य निघालं होतं. गेल्या बारावर्षांत श्रीमंतांच्या घरीं वाजंत्री वाजल्या नव्हत्या ! म्हणून कुमारी विमलच्या लग्नाला अपूर्वाई आली होती. राजाचा आनंद तो प्रजेचा आनंद, राजाचे दुःख ते प्रजेचं दुःख. अगदीं ह्याच प्रकार पोकळ--पुरात होता. नानासाहेब म्हणजे पोकळपुरचें बड्यांतले बडे प्रस्थ. त्यांच्यापुढें गांवचा फौजदारच काय पण कलेक्टर सुद्धा डौलानें अधिकार प्रदर्शन करूं शकत नव्हता. राजदरबारीं नानासाहेबांचं वजनच तसं भयंकर होतं !

नानासाहेबांच्या आश्रित वर्गात कोणालाही स्वतःचं दुःख क्षणभर किंवा विमलचं कार्य पार पडे तो पर्यंत, विसरणचं भाग होतं. त्यानी आपला दुखवटा तहकूब ठेवून, हसरा चेहरा उसनाच आणावयास पाहिजे होता. बड्या अमंलदाराचा किंवा राजघराण्यांतील कुटुंबियांचा दुःखवटा सार्वजनिक रीत्या पाळण्याची प्रथा असते. त्यावेळीं, फारावर्षांनी पोर झालं म्हणून हर्ष भरानं कोणी अंतर्यामीची उर्मी बाहेर फोडू शकत नाहीं. उलट राजघराण्यात जन्मोत्सव साजरा होत असेल तर प्रजेनीं सुतकी चेहऱ्यांनी चालणंही गुन्हा समजला जाण्याची भिति असते !

विमलचं लग्न तसं म्हटलं तर पोकळपुरांत व्हावयाचं नव्हतं. ते, पेशव्यांच्या पुण्यात, सुखसोईचं लग्नाच्या दृष्टिनं आगर ठरलेल्या पुण्यांतच होणार होते. आणि म्हणून श्रीमंतांच्या लग्नाला कोणी कोणी जायचं याच्या याद्या चालू होत्या. ज्याचं नाव त्यात घातलं जाईल त्यानी मुकाट्यानं घरच्या अडचणी घरींच टेऊन, प्रवासाला निघण्याची तयारी करणं जरूर होते. युद्ध पुकारलं गेल्यावर रिक्रूट भरतीची सरकारला आवश्यकता वाटली म्हणजे जशी नावाची यादी तयार होते व मग सक्तीनं लढाईवर निघण्याचा हुकूम बिनतक्रार पाळावा लागतो तशीच सक्तीची आज्ञा खुषीनें पाळण्याची पाळी आज पोकळ--पुरात नानासाहेबांच्या छत्राखालीं त्यांच्या नावानें मीठभाकर खाणाऱ्यावर आली होती !

लग्न म्हटलं म्हणजें लाडूंच्या राशी, जिलब्यांची ताटं, तुपाचे डबे व साखरेची पोती, आपल्या डोळ्यासमोर उभी राहातात. मग घृतकुल्या मधुकुल्याबद्दल लोकाना तर उत्कंठा व अधीरत वाटावयास पाहिजे. पण तसं न होता कांही व्यक्तिच्या घरात, चिंतेची छाया पसरली होती. यावरून त्याना विमलच्या लग्नात कुमक म्हणून पहिल्याच तुकडींत रवाना व्हावे लागणार होतें असे दिसते. आणि त्याना आपल्या प्रापंचिक अडचणी. लग्नाहून परत येई पर्यंत विसरणे भाग झालं असावे !

## रामभाऊंच्या घरांत.

"हा तर जुलूमच झाला म्हणायचा. आलंच पाहिजे म्हणजे काय ? आपल्याला कांहीं संसार आहे की नाही ? चक्क येत नाहीं

म्हणून सांगा. घरांत बायकावर रागावले म्हणजे जमदग्नीचा अवतार ! आणि आता पाळी आली आहे तर नानासाहेबाच्या पुढं ब्र काढण्याची तयारी नाही. ते कांहीं नाहीं. सोशिकपणाला तरी कांही मर्यादा आहे कीं नाहीं ! वेळीं अवेळी घरातली कामं हातातली फेकून आपली याची काम करीत बसा. चार दिवस झाले. पोर तापान फणफणलाय त्याची कांही दखलगिरी आहे कीं नाहीं ?" अगदी जालीम मात्रा दिल्याशिवाय पतिराजांच्या कानात कांही शिरायचं नाही, अशी, खात्री असल्यामुळे, राधाकाकूनी आज जीभ मुद्दामच सैल सोडली. दिनूचा ताप चार दिवसांत निघालाच नव्हता यामुळें, त्यांना धास्ती वाटूं लागली होती.

बायकोच्या बोलण्यांत रोजच, दाबून भरलेल्या फटाकड्याप्रमाणें शब्दाचे आवाजी बार, वाजत. तरी आजचे फटाकडे जरा कडाडणार रामभाऊंना वाटलेच. बायकोच्या उतावळ्या स्वभावाला, आपल्या धिम्या वृत्तीनें लगाम लावण्याचे काम ते रोजच करीत. परतु आजचे बायकोचं बोलणें त्याना तंतोतंत पटत होत. त्यामुळें, तिच्या आजच्या माऱ्यातून निसटणं रामभाउना कठीणच वाटू लागले. दिनू हा त्यांचाही मुलगाच. तेव्हा त्याच्या तापानी आणि विशेष म्हणजे चार दिवसांत ताप निघालाच नाही या गोष्टीनी त्यानाही बे चैन झाले होतं. पण बायकांच्या इतकं हळवं मन पुरुषाच असत नाहीं. केव्हाही काठिण्य काकणभर जास्त त्यात असायचच. लग्नाला जावं लागणार हे तर देवच बोलला होता. परतु अद्याप ८।१० दिवस अवकाश होता प्रत्यक्ष लग्नाला. तितक्या दिवसात घरातली अडचण

कमी होईल अशा हिशोबानी रामभाऊ समाधान मानीत होते. परंतु काल एकाकी, दोन दिवसातच आघाडीवर पहिल्या खटपटी लोकांतच रामभाऊना जाण्याची आज्ञा नानासाहेबांनी फर्मावली होती. आणि या जहागीरदाराच्या वटहुकमामुळेच रामभाऊंच्या घरचं वातावरण गढूळ झाल होतं.

नानासाहेबाना नाही म्हणणं, रामभाऊसारख्या गरिब नोकराला कठिणच काय पण अशक्यप्रायच होतं. मामलेदाराचा हुकूम अवलकारकुनानीं न मानण्या इतकंच ते असंभाव्य होतं. पण इकडे बायकोला तोंड कसं घ्यावं हाही तितकाच अवघड पेंच भोळ्या भाबड्या रामभाऊना पडला. काहीतरी बोलायलाच पाहिजे म्हणून ते म्हणाले. " अगं तुझं म्हणणं अगदी खरं आहे. श्रीमंतांची ताबेदारी किती पत्करायची ? पण आपल्या परिस्थितीकडेही बघितलचं पाहिजे कां नाही ? आपला हा संसार गरिबीच्याच स्वरूपात का होईना पण जो रंगारूपाला आला आहे तो तरी त्याच्या आश्रयाच्या सावली खालीच ना ! बरं त्यातून त्यांचेकडे काय असं हें बारावर्षांनी निघालेलं याचाही विचार पडतोच. आज इतकीं वर्षे, त्याची चाकरी वेळकाळ न पहातां बजावली नी आताच त्यांच मन दुखवायच जरा जीवावरच येतं. त्यातून श्रीमंताच्या कानावर दिनूच्या तापाची गोष्ट मी घालून ठेवीन. त्यानी ओळखलीच गरिबाची अडचण तर बरंच झालं. "

" छान ! अहो ज्याची अडचण त्याला ठाऊक. त्याना काय वाटणार त्याचं ? त्यांना सगळा आनंदच भरलेला दिसतोय. स्वतःचा

मुखावरून दुसऱ्यांची कल्पना करणारे हे लोक. ते काही नाही. अगदी ह्या वेळी धीर कराच आणि चक्क सागा कीं मुलगा तापान आजारी आहे. वाटलंच लौकर त्याला बरं तर येईन लग्नाच्या वेळे पर्यंत. पण उद्या निघणं जमणार नाहीं म्हणून "

रामभाऊंची वकिली उपड्या घड्यावरच पडली ! आज बायको आपल्याला पेचप्रसंगात जास्त जास्त लोटीत आहे. तिला आपली अडचण उमगतच नाही यामुळे, डोक्याला सहसा शीण न देणारे रामभाऊ आज आपलं बुद्धि सर्वस्व पणाला लावून, परिस्थितीतून बाहेर पडण्याचा मार्ग हुडकूं लागले ! परंतु कोड्याचा उलगडा मुळींच होईना. तेव्हा तूर्त " बरं बघतो कसं जमेल ते. मागून पहातो मागाहून येईन म्हणून. अगदीच उद्या नको " असा अगदी व्यवहारी जबाब देऊन रामभाऊ आपल्या पत्निच्या माऱ्यातून निसटले.

या उत्तरानं राधाकाकूंचं समाधान अर्थातच् झालं नाही. पण तितक्यात दिनूच्या हाका मारण्यानें त्याही घरात गेल्या.

## नानासाहेबांची लग्नघाई !

नानासाहेबांच्या जिवाची अगदी धादल उडून गेली होती. लग्न अगदी बडेजावीनीं गाजून वाजून झालं पाहिजे यामुळें, लग्न ठरल्या दिवसापासून त्याना दिवस लहान वाटू लागला होता. वास्तविक दिवस जास्त मोठा झाला होता. गडीमाणसाना, कारकून

दिवाणजींना, जेवणापुरतं घरीं जाऊन उरला वेळ सर्व नानासाहेबांच्या इथं काढावां लागत होता. आमंत्रणाची यादी अगदीं आठवून आठवून, कानाकोपऱ्यातून नांव काढून, लांब लांब होत चालली होती. त्यातून त्यांच्या सारखेच जहागीदार इनामदार, बडे सरकारी अमंलदार ह्यांना स्वदस्तुरची आग्रहाची पत्रें लिहिणे भाग होते. व काहीं निवडक लोकांच्या तर गावीं जाऊन आगत्यपूर्वक बोलावणी करा वयाची होती.

नोकरवर्गाला काम जास्त पडल्याबद्दल तितकसं वाईटही वाटलं नमत पण, श्रीमंतांकरतां काया कष्टवून त्याच्या मोबदल्यांत काय मिळणार होत ! आजवरचा त्यांचा अनुभव निराशा जनक होता. त्यामुळेंच ही लग्नाची पर्वणी कोणाला, हुरूप-उत्साहाची वाटत नव्हती.

लग्नात दारूकाम डोळे दिपविणारे होणार होते, बॅंड एकाच्या ऐवजीं दोन वाजणार होते, फुलाहारांचे ढीग खर्ची पडणार होते. तुप साखरेची चंदी उडणार होती. विजेची रोषणाई नाविन्यपूर्वक, नयन मनोहर व चित्त प्रसन्न करणारी व्हावयाची होती. वधुवरांनां शुभाशिर्वाद काव्यांत मिळणार होते. वधु-वरांच्या छब्या छापून, सुंदर छपाईत गुळ-गुळीत कागदावर, लग्नाची निमंत्रण जाणार होती. कापडवल्यांची पोटं मोटीं होणार होती! किराणा वाल्याच्या उदरीं शनीच उपटणार होता ! आणि हा अपूर्व सोहळा जहागिरदारी थाटानें, यथासाग पार पाडण्या-करतां, पाण्यासारखा पैसा लागणार होतां. तो आजच नानासाहेबांजवळ नसल्यामुळें पोकळ पुरचा श्रीमंतांचा सुंदर वाडा, चंदू मारवाड्याकडें

आठ हजाराला गहाण पडणार होता! वेळेवर इतकी रोकड मोजून देण्याबद्दल नानासाहेब चंदूकडे कृतज्ञता बुद्धिनी पहात तर चंदू श्रीमंताच्या चौसोपी, भव्य व उत्तुंग वाड्याकडें आशाळभूतपणानं पहात होता !

यथावकाश मोठा लवाजमा पुण्यांत येऊन दाखल झाला. रामभाऊनां शेवटीं दिनूच्या आजारीपणाची काळजी सर्वस्वी राधाकाकूवर टाकून ठरल्याप्रमाणें पहिल्या तुकडीतच जाव लागलं. सरदार विंचूरकरांच्या वाड्यांत मुलीचा जानोसा पडला.

लाकडी शृंगारलेल्या डौलदार कमानी दारापुढे उभारल्या गेल्या. त्यावर विजेच्या चिमण्या रंगी बेरंगी दिपमालेची वेल चढविली गेली. उघडझाप करींत ती दीपमाळ जणू मिस्किलपणानें डोळे मिचकावीत आल्या गेल्याचे स्वागत करीत होती. झाडजूडबुडाचे केळीचे खांब दोन बाजूला उभे राहून एकमेकाना शेकहँड करीत हातांत हात ठेवून स्तब्ध उभे राहून पहारेकऱ्याचें काम बजावू लागले. दारापुढल्या अंगणात सडासंमार्जन होऊन रांगोळ्या उमटल्या.

वाड्याच्या आतल्या भागांत तर वैभवाचं नी बडेजावीच लक्षण बारिक सारिक गोष्टींतही आढळून येत होतें. पल्लेदार मांडव, बड्या पाहुण्यांना आपल्या पोटांत जागा देत होता. आधुनिक सारीं तंत्र वेठीला धरलीं गेली होती. लाऊडस्पीकरमुळें, मांडवाच्या टोकाला बसलेल्यालाही, संगीताचा आस्वाद मनमुराद लुटता येत होता.

रात्रीची वेळ असल्यामुळें विजेची ऐट फारच वाढली होती. पाहुण्याचा जीव उकाड्यानीं त्रासूं नये म्हणून डोक्यावर वाऱ्याचा स्रोत अखंड सुरु होता. लोकप्रिय गायकाच्या वागड्या पाहुण्याची करमणूक करीत होत्या व लग्नघटका येईपर्यंतचा काळ कंटाळवाणा होऊ नये म्हणून झिजत होत्या !

नानासाहेबाचा पोकळपुराहुन आलेला नोकर वर्ग नेमून दिलेल्या कामात गर्क होता. निदान तसे दाखवित होता. त्या सर्वांच्या कानात संगीत घुमत होतं. नाकात अत्तरगुलाबाच्या पाण्याचा गन्ध शिरत होता नीं डोळ्यात एकंदर भव्य भपका भरत होता. पण चहूबाजूनी या प्रमाणें आनंदाचा मारा चालू होता तरी बिचाऱ्या रामभाऊंचे डोळे दिनूच्या बिछान्याकडे लागले होते. यंत्राप्रमाणें त्याचे हात काम करीत होते परंतु चित्त मात्र पोकळ पुरांत स्वतःच्या घरात अडकले होते.

पोकळ–पुऱ्यात पाहुण्याना या जमा करीत ते आपली ड्युटी बजावीत होते ! इकडे पोकळ–पुरा, त्यातला जहागीरदारी रूबाब बाहेर पडल्यामुळें उदास दिसू लागला होता. त्यातच रामभाऊंच्या घरात तर दिनूच्या बळावत चाललेल्या दुखण्यामुळें दुःखाची गडद छाया पसरली होती. रामभाऊना जावे लागल्यामुळें राधाकाकूंचा अर्धा धीर खचला होता. वैद्याचं औषध चालू होतं. परन्तु ताप न हटून तो दोषिक असल्याचे निदान झाल्यापासून तर राधाकाकूंच्या तोंडचे पाणी पळाले होते.

गावात डॉक्टर असा एक होता. तो म्हणजे सरकारी डॉक्टर. त्याच्या कानावर दिनूची वार्ता जाताच तो आपणहून राधाकाकूंच्या घरीं येऊन तपासणी करून औषध देऊ लागला होता. डॉक्टरसाहेब गरिबांचे दुःख जाणणारे होते. पुरुष माणूस ऐन आणीबाणीच्या प्रसंगी घरीं राहूं न शकल्याचे पाहुन तर डॉक्टर साहेबाचें हृदय कळवळले व स्वतः करता येईल तितकी मदत करून, गरिबाची वेळ निभावून नेण्याचा त्यानी निर्धार केला.

परोकारी डॉक्टरांचे उपचार अटोकाट चालू होते. प्रेमळ आई तर भूक तहान विसरुन, दिनूच्या उषाशी सेवासुश्रुषा करीत परमेश्वराला आळवीत होती ! गांवातल्या दोनचार सज्जन गृहस्थानी बाजारातून फळें वगैरे आणण्याचें व औषध आणण्याचे काम आनंदानें आपण होऊन पत्करले होते. या सर्वांच्या प्रयत्नाना यश याव असं गावांतले लोक चिंतित होते. परंतु, दिनूला मात्र उपकाराच ओझं जणू जाणवतच नव्हतं. कारण तो कोणाचीच पर्वा न करता, हळू हळू या नश्वर देहाचा त्याग करण्याच्या तयारीत होता ! प्रकृती मानवी प्रयत्नांच्या बाहेर जात असल्याचे सर्वांनाच दिसू लागले. मरणाची घटका जवळ येऊ लागली ! राधाकाकूंच्या डोळयाला पूर आला !!

पुण्यात लग्नाच्या मूहूर्ताची घटका भरताच मंडपातल्या पाहुण्यानी टाळया वाजवून आपले कर्तव्य बजावलें व अक्षताचे चार दाणें, वधु-वराच्या दिशेला फेकून ते पानसुपारी घेण्याच्या तयारींत

राहिलें. वादनांची एकच गर्दी उसळून फोनो, ताशा, वाजंत्री व बॅंड सर्वांनी संगीताचा चिवडा केला !

रामभाऊनीं आपल्या हातातल्या अक्षता, गोंगाट होतांच फेकून दिल्या ! त्या वधुवरांच्या डोक्यावर न जातां रामभाऊंच्या पुढेंच बैठकीवर पडून पायदळी गेल्या ! !

पोकळ पुरांतल्या वातावरणाला भिहूनच कीं काय दिनू आपल्या निर्याणाला मुहूर्त हुडकु लागला. आणि विचित्र योगायोग असा की, जाहागीरदारांच्या विमलेच्या डोक्यावर ज्या शुभ मुहूर्तावर, पुण्यात लग्नाच्या अक्षता पडल्या त्याच मुहूर्तावर पोकळ-पुरांत राधाकाकूंचा दिनू निर्जीव होऊन पडला !! एवंच श्रीमंताच्या मुलीचं लग्न हे एका गरिबांच्या आयुष्यांत भयंकर विघ्न ठरलं. !





# पहिलाच पक्षकार गळ्यांत पडला !



'नलू, जा बरं हे भाडं नेऊन दे. आणखी पावतीही घेऊन ये दिलीतर हो, आता आले असतील वकील '—काकांचा हा हुकूम होतांच, काकांच्या हातांतून, पाच पाच रुपयांच्या सहा नोटा घेऊन एक सुंदर युवति हसतमुखानीं, पाठीवरच्या शेपट्याला हिसडा देऊन, थोडया अधीर गतीनच बाहेर पडली.

काकाच्या हुकमांत वकिलाचा उल्लेख वाचून, तीस रुपये भाडयाचे घेणारा तो भाग्यवान घरमालक असावा असा तर्क कोणी करील, परंतु इतका भाग्यशाली तो नव्हता !

वकिलीची परीक्षा यंदाच उत्तीर्ण होऊन, आपला भविष्यकाळ सुखसंपन्न करण्याची मनिषा धरून, तो तसा होणारच अशी वेडी पण गोड आशा उशाला घेऊन निजणारा तो एक होतकरू वकील होता. त्याच्या ' वकील ' या अर्थपूर्ण अलकारानें रंगलेल्या पाटीचा ओलावा अद्याप कायम होता. वकीली करण्याचा परवाना म्हणून पन्नास रुप-यांची जबर फी त्यानी नुकतीच मोठ्या कष्टानी भरली होती, व याच पन्नासावर अनेक पूज्यें चढवून आपला भाग्यफलक चितारून काल्पनिक आनंद सागरांत डुंबणारा तो एक महत्वाकांक्षी तरुण होता.

लटपट व खटपट याच दोन पायांवर उभं राहील्याशिवाय ह्या धंद्यात बरकत नाही. नुसत्या तल्लख बुद्धिचा किंवा प्रामाणिक व्यव हाराचा, गिऱ्हाईकी गोळा करण्यात काडी इतकाच उपयोग असतो हे व्यवहारातले कटु सत्य त्याला ठाऊक होते आणि म्हणूनच चार चौघात कारणावाचून शिरून लोचटपणाचा आरोप पत्करून त्यानी अलीकडे गेल्याच महिन्यात एक कुळ पैदा केलं होतं.

ते कुळ म्हणजे थोडया अवकाशानी परंतु नियमितपणाने अंडयाची हुंडी मालकाच्या हातात देणारी कोंबडीच होती ! फार वळ-णानं वर्णन न करता अगदी शॉर्टकटनी सांगावयाचं म्हणजे, त्या होत-करू वकिलानी एक चाळीचा मालक गाठला होता किंवा गठवला होता म्हणा. मालकाच्या चाळी बऱ्याच होत्या. त्यासर्वांचं भाडं वसूल करण्याचे काम नि जरूर पडल्यास वकिली सल्ला देऊन वेळच पड-ल्यास कोर्ट दरबार उरकण्याचं काम वकिलानी पत्करल होत. आणि या सगळ्याचा मोबदला म्हणजे बिन भाड्याची जागा वकिलांना मालकाच्या एका चाळींत पटकावली होती ! अशा रीतीनं भाडे वसूल करण्याची कामगिरी, वकिलाच्या हातांत आल्यानंतर, भाडं भरण्याचा पहिलाच प्रसंग विनायकराव याना आला होता व त्या करताच त्यानी आपल्या पुतणीला, तीस रुपयाच्या नोटा देऊन वकिलाकडे जायचा हुकूम सोडला होता.

वकिलाचा संसार तीन खोल्यांत साठविला होता. बाकी आज पाहिलं तर, त्याना ही जागा वाजवी पेक्षां जास्त वाटूं लागली होती.

कारण त्याचा प्रपंच एकाच खोलीत मावण्या इतका मोठा होता. टेबल, दोन खुर्च्या, ह्याच काय त्या किमतवान वस्तु. बाकी मग एक जुनी ट्रंक ! मात्र खोलीचा खरा अलंकार म्हणजे एल एल. बी. चे सुंदर चौकटीत फ्रेम केलेले सर्टिफिकीट ! लहान कस्तुरी उदबत्तीने जसे खोलीतले वातावरण प्रसन्न व सुगंधयुक्त करून टाकावे, तसे त्या चिमुकल्या सर्टिफिकीटाने, वकिलाच्या ऑफिसचे वातावरण करून टाकले होते. धंदा नुकताच सुरू केलेला असल्यामुळे, टेबलावर कागदाचा ( अगि लाच्या ! ) पसारा नव्हता. कायद्याच्या पुस्तकांची जरूर तर वकिलांना मुळीच भासत नव्हती ! टेबलाचा माथा अगदीच टक्कल पडल्या सारखा गुळगुळीत दिसू नये म्हणून, त्यावर एक कचकड्याचे दिसण्यात सुंदर पण किमतीत एकदम माफक असे बर्षानुबर्ष काम देणारे कॅलेंडर ठेवलेले होते. एका बाजूला, उन्मादकारी रसरंगांच्या अर्धांगी चित्राने नटलेले कोरकरकरीत पॅड होते.

लिहीण्याचे साहित्य म्हणून फॅन्सी दौत टाक व एक तांबडी पेन्सिल ही टेबलाचा भकासपणा कमी करीत होती. गरिबाची गोर जशी चारच पण सुंदर चित्रांनी शोभिवंत करण्याचा प्रयत्न केलेला असतो तसाच प्रयत्न वकिलांनी ऑफिसची शोभा वाढवीत भरण्या करता, दोन नटींची मोहक चित्रे टांगून केला होता !

वकिलाच्या खोलीत अशिलांची गर्दी असणे सोभाग्याचे नी धंद्याच्या जिवंतपणाचे लक्षण असते ! असे कोणतेच सुलक्षण या कथा—नायकाच्या खोलीत आढळत नव्हते. अर्थात् यात विलक्षण

वाटण्या मारख काहीच नव्हत. कारण, तो होतकरू वकील होता ! आणि होतकरू म्हटला का त्याचा यशोदुदुभी वाजायला थोडा अवकाश असतो !

तूर्त बिन भाड्याची रहायला जागा मिळाल्यामुळे वकिलाची एक मोठीच काळजी दूर झाली होती. संध्याकाळच्या दोन शिक वण्या मिळवून वकिलांनी आपल्या पोटाचा प्रश्न तूर्त सोडविलेला होता. तेव्हा सकाळचा उद्योग म्हणजे, मालकाच्या भाड्याचा काही हिशोब असल तो पहाणे. व उरलेल्या वेळात टाईम्स वाचून, वेळ त्यातूनही उरलाच तर गिऱ्हाईकाची वाट पहात, तोंडातून बेफीकीर पणे धूर सोडीत बसणे ! अगदीच माशा मारत बसण्यापेक्षा धूर सोडीत बसण केव्हाही बरच म्हणायच !

आज रविवार. अगदी नामांकित, कान खाजवालाही वेळ नाही असा वकील मुध्दा थोडा रिकामाच सापडावयाचा. तव्हा कान खाजवि-ण्याशिवाय दुसरा महत्वाचा उद्योगच नसलेल्या वसतरावाना ( हेच आपल होतकरू वकील ) तर सवड होतीच ! चहापाणी उरकून नुकतच ते खुर्चीवर येऊन स्थिरामन्न झाल होते. मालकाच्या भाड्याचा हिशोब चाळण्याकरतां छापील पावतीबुके हाताळीत मनातल्या-मनात बेरजाचे हिशोब करीत ते बसले होते. इतक्यात गपटाचा आखूड साटीवर फडफडविणारी, अस्मानी रगाच पातळ नेसलेला व बिन बाह्याच नि सैलस ब्लाऊज घातलली अल्लड युवती, वकिलाच्या खोलीत प्रवेश करिती झाली

## अशिलाची गांठ.

" हे भाडं दिलायं काकानी. दोन महिन्याचं आहे वाटत. अन् "

तरुणीच्या तोंडातून, अपुरच वाक्य, ओघळलेल्या सरासमाणे बाहेर पडताच,

वकिलाचं लक्ष त्या तरुणीकडे जाऊन त्याना थोडं आश्चर्य वाटले. पण सुखद संवेदनेची झुळूक, अगदी शीतल वाऱ्याच्या झुळुके-सारखी त्याना चाटून गेल्यासारखे वाटले. आणि पुढले शब्द बाहेर पडण्यापूर्वीच " काय ? बसा " असे कांही तरी शब्द वकिलाच्या तोंडांतून बाहेर पडले. त्या क्षणार्धात अनेक कल्पना त्याच्या मनांत लाटेसारख्या उत्पन्न होऊन विरून गेल्या.

कल्पना कितीही रम्य झाल्या तरी व्यवहाराच्या बाजारात त्याना किंमत बेताचीच. समोर उभ्या राहिलेल्या मुलीकडे नुसत पाहात राहून चालणार नव्हत. तिच्या कामाचा उलगडा करून त्या प्रसंगातून मुक्त होणं जरूर होत.

" कोण काका तुझे ? काकाच्या नावान पावति फाडूं ? वकील उद्गारले !

वकिलाच्या विनोदगर्भित चेष्टेनी तरुणी ओशाळली. तिला आपली चूक लक्षात आली. नुसतं काका नी मामा सांगून काय उपयोग ? कोणाचं भाडं समजाव त्यानी ! लागलीच " ताम्हने विनायकराव " असा खुलासा तिने केला.

“असं. विनायकराव तोम्हण्याचं भाडं तू आणलंस ” ? वसंतराव स्मितार्ची छोटीशी छटा चेहऱ्यावर उमटवित बोलू लागले. हस्ते काण लात्र असा आणखी एक विनोदाचा खडा टाकून पाहायचं वकिलाच्या मनात आलं होतं! पण ते श्लीलतेच्या मर्यादेत मावेल की नाही अशी त्यांची त्यांनाच आशंका वाटून तो मोह त्यांनी आवरला. नलूने नोटा एक एक टेबलावर टाकून “ तीस रुपये आहेत. दोन महिन्याचं भाडं ” अशी खुलाशाची पुस्ती जोडली.

वास्तविक पाच रुपयाच्या सहा नोटा म्हणजे तीस रुपये व तीस रुपये म्हणजे दोन महिन्याचं भाडं हे गणित सोडवायला काही गणिती नको होता. परंतु जरूर नसताना अनेक गोष्टींचा आपण उच्चार करीत असतो! त्यातलीच ही बाब

नोटा मोजून वकिलांनी अगदी त्या कागदाच्या चिटोऱ्या समान आपणास असल्याचा भाव दर्शवून निष्काळजीपणाने त्या टेबलाच्या खणात कोंबल्या !

‘पावती मागीतली आहे’ काकाच्या निरोपातला महत्वाचा भाग आठवून नलूने म्हटलं.

‘वा: मग ती अगदी तिकीटावरच लागेल’ वसंतराव चेष्टेच्या सुरात उत्तरले.

हसण्या पलीकडे नलू काय करणार! वकिलांनी ताबडतोब बिलबुक उघडून, पावती फटकारून तिकीट लावून सही ठोकून टेबलावर फेकून दिली!

वकिलाचा हा बेफीकीरपणा, व बहूटपणा सर्वच काही नलला मोहक वाटल नोटा कागदासारख्या, मानण्या इतके तत्वप्रधान ते असतील का ? जगाकडे निष्काळजी पणाने. दृष्टीफेक करण्यात दुःखाची तमा आपण धरीत नाही, सुखाचे कणच तेवढे टिपून आपण घेतो अशीच हृदयाची उदार साक्ष त्यानी दिली काय ? असे विचार नलच्या मनात नाचू लागले परतु भाड्याची पावती मिळाल्यावर तिथ जास्त थांबण्याचा तिला काय अधिकार होता ? तेथून काढता पाय घेणे हेच क्रम—प्राप्त होत. मात्र एकदम निघून जाण्याला तिचे पाय वळेनात. तिच मन तिथच घोटाळू लागल. कोणत्या निमित्ताचा आधार घेऊन वकिलाशी दोन शब्द बोल ? असला विचार करीत असताच एकदम तिचा मुख चद्रमा उजळला ! अत्यत जरूरीची वस्तु मिळाली अगर हरवलेला जिन्नस सापडला म्हणजे अभावितपण चेहरा प्रफुल्लित होता. तिच्या ही तोंडावर समाधानाच इद्र धनुष्य प्रकटलं.

काहीस आठवल्या सारख करून तिने कापऱ्या आवाजात म्हटल " माझ काम आहे थोड आपल्याकडे "

' म्हणजे, भाड नेऊन देण्यापलीकड आणखी काही काकानी सांगीतलाय वाटत विचारायला " वसतरावानी, आशेची पालवी फुटल्यागत अधीरतन विचारल !

' काकानी नाही पण--' तिच्या तोंडात शब्दगगा गोठून अडकून पडली वकिलानी तिची अडचण ताडली व म्हटले " बोल ना काय काम आहे. त्यात लाजण्यासारख आहे काय काही ? "

"तुमच्याकडे मला सल्ला विचाराला यायचं आहे"–नलूने मोठी हिंमत करून अंतःकरणात दडलेल्या भावनाना वाट फोडली.

"यायच आहे म्हणजे, आता गेलं पाहिजे आधी फिरून यायच तर" वकीलानी धीर करून विनोद केला !

"इश्श ! यायचं म्हणजे कागद घेऊन यायचं आहे. मज जवळ एक कागद आहे. तो पाहून त्याचं काय करायचं ते सांगा. अगदी जीवा पलीकडे जपून ठेवला आहे. काकाच्या हातीचं जायचा तो. पण मोठ्या शिकस्तीनं तो मी मिळवून अगदी काळजीन जतन करून ठेवला आहे" नलूने आपलं मनोगत उघडं केल.

"इतका कसला कागद आहे ? काही खरेदीखत वगैरे आहे काय ?" वकिलांना आपल्या कायद्याच्या कक्षेत प्रवेश केला.

"ते काही मला समजत नाही. बाबांनी बरेच पैसे फंडाचे घेतलेले काकाना दिले होते. त्याबद्दल त्यानी काकाकडून कागद लिहून घेतला होता"-- कोड्याचा भाग हळू हळू उलगडीत नलू बोलू लागली.

"हं, म्हणजे प्रॉमिसरीच अंमल तो दुसरं काय" वकिलानी कोडं उलगडल्याचा भाव दर्शवून म्हटले "बर पण वर्ष तरी किती झाली आहेत ? हो, त्याच्यावरून काम चालवायला मुदत असते." आपल्या वकिली ज्ञानाचा आयुष्यात प्रथमच उपयोग करीत वसंतराव उद्गारले.

" वर्षे चांगली तीन होत आली असतील. नाहीं तर झालींही असतील कदाचित् " आठवण करीत नलू बोलली.

" छान ! अग झाली असतील तीन तर कामच झालाय म्हणायचं ! मग तो कागद म्हणजे कोरा कागदच ! तीन वर्षांच्या आत दावा आणायला पाहिजे त्यावरून " वकीलांनी हातातलं सावज निसटून चाललं अशा भावनेनं म्हटलं.

"अस्सं होय ! मग मी आतांच आणते दाखवायला तुम्हाला. काहीं होईल, तर पहा. तेवढाच मला आधार आहे; काका काय मला देणार ते दिसतच आहे ! आताशा तर मी म्हणजे त्यांना एक धोंडच वाटू लागली आहे. " घरातल्या अंतस्थ भानगडींना वाचा फोडून नलू बोलली.

" तुझ्या काकांना काय कमी आहे अं, चांगला तिनशे रुपये पगार आहे मला वाटतं त्यांना. तू त्यांना जड वाटावी ! नवल आहे बुवा " सहानुभूतीच्या स्वरांत वकील उद्गारले.

"आहे. पगार अगदी टांपलीभर आहे, मला काय त्याचा उपयोग ? मी पडले त्याची पुतणी. मला ना आई ना बाप. मग जड का वाटू नये ? म्हणूनच म्हणतें, तो कागद हाच माझा आधार. त्यातून कांहीं निष्पन्न झालं तर पहायचं " केविलवाणा चेहरा करून नलूनें म्हटलें.

आतां मात्र आपल्यापुढें आपला पहिला पक्षकार उभा आहे याची वकिलांना खात्री पटली.

लग्नानंतर पहिलंच मूल नी, वकील झाल्यानंतर पहिलंच कूळ भेटलं म्हणजे ब्रम्हानंदी टाळी लागल्याचा आनंद होत असतो. अर्थात् याची प्रचिती माता नी वकील होऊन अनुभवली पाहिजे. वसंतरावाना पक्षकार या नात्यानं सल्याचे दोन शब्द विचारीत उभी राहिलेल्या नलूला पाहून अपार आनंद वाटला ! मात्र नव्या वकिलाकडे आलेला अशील कितपत हात ओला करणार याबद्दल नेहमीच शंका असते. कागद नाणावलेल्या जुन्या वकिलांनी अगदी साफ केल्यावर मगच 'माफ करा बाबा' असे उद्गारत ते नवीन वकिलाच्या घराची पायरी चढतात. त्यावेळी त्याचे मनात इच्छा असूनही खिशात काही उरलेले नसते! नलूच्या एकंदर कहाणीवरून तिच्या कामाची पुसट कल्पना वकिलाना आली. परंतु कसही असलं तरी ती पहिला पक्षकार होती. हातचा घालविणे इष्ट नव्हते. असा सर्व पोक्त विचार करून वकिलांनी, ताबडतोब कागद दाखवायास घेऊन ये म्हणून नलला फर्माविले. हो, आता फर्मावण्याचा अधिकार त्याना प्राप्तच झाला होता.

चटकन जाऊन कागद घेऊन यायचं पण वकिलाना द्यायचं काय ? हा बिकट प्रश्न तिच्यापुढे उभा राहिला. व त्यामुळ मुखबिंबावरचा रंग पुनरपि फिका पडला. आपल्या जवळ कागदाशिवाय द्यायला काहीच नाही, तेचि आपली माया, झाल तर त्यातूनच जग निर्माण होईल. नाहीतर वकिलांचा सल्ला मोफत घेतल्यासारखच होणार. अशा विचारांनी तिचें हृदय भारावून ती क्षणभर स्तब्ध झाली. परंतु दुसऱ्याच क्षणी पुन्हा धीराची मोट बांधून तिने आपली अडचण वकिलाना सांगायचा प्रयत्न करीत म्हटले "हो, पण कागदातून काही निघाल तर ठीक आहे पण तुमच्या फीची तजवीज मी काय करणार ? हा चिटोरा हेच माझ धन"

पहिलाच पक्षकार गळ्यांत पडला !

ज्या पायाला भीत होता तेच अखेर दत्त म्हणून उभे राहिले असेच वकिलांना वाटले ! पहिला पक्षकार भेटला. पण दणदणीत कोरडा शी काय ? असा विचार करीत आहेत तोच, दावाच दोन झाले तर खर्चाची व्यवस्था काय करणार ? काकाच्याच पैशाने काकाच्यावर दावा, !

ही आतापर्यंत न सुचलेली अडचण लक्षात घेऊन वकिलांची परीक्षेचीच वेळ आली. या आपत्तीतून तात्पुरत्या सुटकेचा मार्ग म्हणून त्यांनी लगेच म्हटले ' हे पहा कागद तर घेऊन ये मग बघू काय करायचे ते". —हा अगदी भिनतोड व्यवहारी सल्ला झाला. भोक पडलेल्या चेंडूला जास्त दाबण्यात अगर, फुटलेल्या टरबुजाला धक्का लावण्यात अर्थ नसतो. फीचा प्रश्न असाच नाजूक होता. जास्त उचकण्यात अर्थ नाही असाच नव्हे हा विचार करून नाक्याची पायरी न विसरता उचलून 'बर मी घेऊनच येते आता. आहे त ना आपण काही वेळ?' असा, होकारार्थी उत्तर आले पाहिजे अशा झोकात प्रश्न केला. अपेक्षित उत्तर मानेनेच देऊन वकील मोकळे झाले.

अनपेक्षित पण गोड गोड घटना घडून येत आहेत. कदाचित इथच आपल्या भाग्याचे बीज असेल. नाही कोणी म्हणाव ! आईबापांच्या प्रेमळ आश्रयाला मुकलेली, सधन परंतु स्वार्थी काकाच्या तावडीत सापडलेली, तारुण्याचा आविष्कार नसानसातून करणारी, सुंदर मुग्ध मुखाची, सद्भावना प्रकट करणारी अशी आपली पहिली पक्षकार ! तिचे चिठोर म्हणजे, आपलेच भविष्य लिहून ठेवलेला कागद

ठरवयाचा ! अशा अनंत सुखद कल्पना वकिलाच्या मनाला शिवू लागल्या.

नलूच्याही मनात विचाराची गर्दी उसळली होती. दुःखाला ढेकणासारखे चिमटीत धरून मोडून देणार, प्रत्येक वस्तूतून सुखाचे मोत कणाकणानी गोळा करणार, बुद्धिची प्रभा मुखावर झळकाविणार, परोपकार करावयास सज्ज असे हे सज्जन वकील! कागद पाहून, काकाच्या दावातून मुक्त करण्याचे श्रेय त्यानी घेतले तर ! असे काबुली द्राक्षासारखे नुसते गोड मधुर विचार तिला सुखावित होते.

अपेक्षेप्रमाणे नलूने एक धक्क्यावर धक्क्या झेलून जणू रहस्य सुरक्षित ठेवलं आहे असा मळकट मुरकुतलेला कागद वकिलांच्या टेबलावर टाकला.

अधीर होऊन वाकिलाने एकएक घडी कागद फाटेल या भितीने हलहळ उलगडीत, भविष्य काळाचा पडदा हलहळ दूर करीत, नलूचा कागद सबंध उलगडून पाहिले तो काय! पाच हजार रुपयाची वचन चिठी! काकानी नलूच्या वडिलाना लिहून दिलेली!! आश्चर्याचा पारा अधिकाधिक चढत चालला. वचन चिठी मुदतीत राहिली होती; परंतु थोड्याच दिवसात मुदतीबाहेर जाणार होती! किती विलक्षण योग! पाण्यात पडलेल्याला अगदी वेळेवर कोणी हात दिला तरच जीव बचावतो. नाही तर जीवनात जीव विरून जायला काय अवकाश? वकिलाकडे अगदी वेळेवर आली, ह्या एकाच गोष्टीच वसंतरावांना इतक नवल व समाधान वाटल की, खर्चाकरता लागणाऱ्या पैशाची अडचण क्षणभर

ते विसरले. हळू हळू विस्मयाचं वारं ओसरून प्रत्यक्ष अडचणींचा. डोंगर डोकावूं लागला.

काकाच्याच्यावर दावा करणे तर प्राप्तच होतं. तो लवकरच मुदत उडण्यापूर्वी करणेही जरूर होते. अडचणींतून युक्तिचा जन्म असतो अशी म्हण आहे. वसंतरावानाही आपल्या चाळीच्या मालका-कडून मदत मिळू शकेल असा भरवसा वाटू लागला. व त्याच दिशेने प्रयत्न करण्याचं ठरवून त्यानी पक्षकाराशी त्या अनुरोधानें बोलावयास सुरवात केली.

" हे पहा. तुम्ही एका दृष्टीनें फारच भाग्यशाली म्हणावयाच्या. तुमच्या वडिलानी काकांना पाच हजार रुपये देऊन त्याबद्दल काकाकडून ही वचन चिठी लिहून घेतली. त्याची मुदत ८ १० दिवसा-तच संपते आहे. दैवाची तुमच्यावर कृपा यात शंकाच नाही. आता अडचण येवढीच की दावा करायला खर्च बराच लागेल. बराच म्हणजे चागले तीनशे रुपये लागतील. पण तुम्ही त्याची काळजी आता करुच नका. "

नलूचा कंठ सद्गदित झाला. उपकाराचं ओझं तिला असह्य-वाटूं लागले. जीवापलीकडे जपलेल्या कागदातून, इतका अर्थ निघेल हीच मूळीं अपेक्षा नव्हती. त्यातूनही, त्या अर्थावर प्रत्यक्ष हात ठेवण्या पूर्वी येणाऱ्या सर्व अडचणींचा निरास इतका विनायासे होईल ही तर तिच्या दृष्टीनें न घडणारी गोष्ट होती. वकिलांच्या आधारावर आपण स्वतंत्र होणार ? त्याची परतफेड कशी व्हावी ? नुसता पैशाला पैसा

मोजून ते परत केल्यानी, ऋणाची फेड होत नाही. हृदयला गुदगुदल्या करणारा त्यावेळचा प्रसंग अपूर्व व विस्मरणांत कधीच नाश न पावणारा होता.

वकील व अशील दोघाच्याही मनांत सुखाचं चांदण पडलं होतं. एकमेकांच्या मनांतल्या विचारांची प्रतिबिंब दुसऱ्याच्या मनात उमटू लागली होती. दोघेही अविवाहित. विवाहाला योग्य अशा वयाची मर्यादा गाठलेले. पसंती होऊन चुकली होती.

उपकार दोघांचे एकमेकावर होते. पहिलाच पक्षकार मिळून मोठा दावा घ्यावयाचा मान, नविन वकिलाच्या दृष्टीनें फार किमतीचा, वसंतरावांना मिळत होता. त्यातून फी आज नाही पण उद्या नक्कीच मिळणार होती. आजच्या खर्चाची सोय करून दावा टेकवि ण्याचा अवकाश की काकाकडून पैनपै खर्चासुद्धा रक्कम वसूल. !

नलूच्या दृष्टीनें तर वकिलाचे उपकार भयकरच होते. काकाच्या आश्रयाखाली स्वातंत्र्याचा बळी देऊन मुकाटपणे दिवस मोजीत राहणारी नलू वकिलाच्या मदतीनें स्वतःच्या पायावर उभी राहाण्या इतकी सामर्थ्यवान होणार होती. आजवर ती अक्षरशः अबला होती. यापुढें, अनिर्बंध अवस्थेत स्वावलंबी होऊन दिवस काढण्याची सोन्याची संधी येणार होती.

कृतज्ञता बुद्धीनें ओझं थोडं हलकं करण्याच्या हेतूनें नलू म्हणाली तुमचे उपकार न फिटणारे आहेत. निदान या जन्मीं फिटणार नाहीत.

सूर्याचा एक किरणही शिरूं शकत नव्हतां अशा अंधारी जागेतून तुम्ही मला एकदम उघड्यावार सूर्यकिरणाखाली स्नान घडेल अशा ठिकाणी आणित आहात."

'हे पहा, माझे उपकार फेडायला कांही दुसरा जन्म घ्यायला नको. अगदी याच जन्मीं ते फिटतील. इतकच नाहीं तर ते सर्व फिटून परत माझ्यावर सुद्धा तुम्ही कर्जाचं ओझं उत्पन्न करु शकाल!" वकिलाच्या विनोदातून ध्वनित होणारा मानस चाणाक्ष नलूने ओळखला व ती म्हणाली.

"इतक्या वळणान कशाला पाहिजे. स्पष्टच सांगा ना उपकाराची फेड करून वर फर्ज तुमच्यावर कसं उत्पन्न करायच तें. हो इतका तोडगा अचूक असेल तर तुमच्या ऋणात रहाच कशाला?"

"कमाल झाली आता! माझं बोलणं माझ्याच गळ्यात आलं म्हणायच! आता असं आहे, माझा तोडगा तुम्ही आगाउच ओळखून माझ्या तोंडातून तुम्हाला त्याचा उच्चार हवा आहे. काय खरं ना? मग ऐकाच तर. मी म्हणतों, माझा पहिलाच पक्षकार माझ्या गळ्यात पडला !!"



# कारंज !






णिपूर’ एक लहानस खेड. वस्ती म्हटली तर दोन अडीच हजारावर भरणार नाही. कारवी नी तावडमाती यातून निर्माण झालेली खोपटी आत रहाणाऱ्याच्या दारिद्र्याची निदर्शक होती. चारदोन सावकाराची नी बामणाची घर साडली तर बाकी सगळा कुणबाउ जमाना ! परंतु गरिबाच्या घरात एकादा किंमतवान अलंकार आढळावा तसाच, एक गावाला भूषणभूत असा सुंदर कारंज, गांवाच्या तोंडालाच प्रवाशांच चित्त वेधून घेत होता.

टपोऱ्या मोती-बिंदू प्रमाणे, सिंहमुखातून, चौफेर तोय तुषार उधळणारा हा शुभ्र स्फटिकाचा मनोहारी कारंज, मोठ्या डौलानं गावच्या वेशीवर ऊभा राहून पाहुण्याच जणू स्वागत करीत होता.

भिकार गावाचा भकासपणा क्षणभर विसरुन, आलेला पाथस्थ कारंजाची सुंदर कलाकृती नुसती पहातच राही. वाळवटात, थंडावा देणारी विसाव्याची जागा, प्रवाशाचे मनात आल्हाद आशा नी हुरुप उत्पन्न करते तद्वतच मणिपुरात शिरणाऱ्या प्रवाशाच्या मनात हा कारंज आल्हादाचा ओलावा उत्पन्न करी !!



कारंजाकरतां, कुणीतरी धनिकानें, मुक्त हस्तानें पैशाची खैरात केली असावी अशी कल्पना, त्याच्या अत्युत्तम, उत्कृष्ट, बांधणीवरून कोणीही करी.

" किती सुंदर. " पायी प्रवास करीत मणिपुरच्या वेशीत शिरलेला एक पाथस्थ, कारंजाच्या दर्शनानें अभावितपणे उद्गारला. " पाथस्थाच्या श्रम परिहार करणारा हा कारंज निर्माण करणारा कोणी तरी रसिक उदार धनवंत दिसतो. पाण्यासारखा पैसा यावर ओतलेला दिसत आहे. परतु तो पैसा पाण्यात गेला असं न वाटतां अगदी कारणी लागला असचं म्हणावास वाटत. !!"

" कारंजाकरता पैसे उधळणारा, धनिक रसिक तर नव्हेच परनु कृपणातला कृपण, व लोभ्यातला लोभी होता !" प्रवाशाच्या शेजारीच उभा असलेल्या मणिपुरवाल्यानें, चकित करुन टाकणारे उद्गार काढले.

" आ, म्हणता काय तुम्ही ! पैशाचा पाऊस पाडून उभारलेल हे सुंदर कारज, पै पैशाकरता प्राण सोडणाऱ्या कृपणाच्या हातून निर्माण झाल ? छे, अशक्य. गावकरी झालात म्हणून, अशा थापा पचतील हो. ! गावकऱ्याची लोणकडी त्याच्याच गळ्यात अडकविली अशा भावनेनें प्रवाशी म्हणाला.

" कुणाला खरं वाटो न वाटो. या कारजाच्या जन्माचा इतिहासच तसा रहस्यमय व विचित्र आहे. तुम्हाला थापा मारुन माझं पोट भरत नाहीं. तुम्हीच काय म्हणा पण आजवर शेकडो प्रवाशी

येऊन गेले त्यांनीही असाच अविश्वास प्रगट केला! म्हणून काही घडलेला इतिहास बदलत नाही." प्रवाशाच्या कुतुहलाचा सागर अधिकच हेलावित, गावकऱ्याने बेफीकीरपणे प्रत्युत्तर केले.

अशी ही नवलकथा, कारंजाच्या रहस्याची आहे तरी काय ते जाणण्याची उत्कंठा तीव्र होऊन, प्रवाशाने अधीरतेने पृच्छा केली. "मग सांगा ना ती कारंजाची जन्मकथा आम्हाला"

"पुराणातल्या कथा एकवेळ आम्ही विसरू. पण या कारंजाची आमच्या गावच्या अमोल अलंकाराची कहाणी आम्ही कदापि विसरणार नाही. आजवर अनेकांना ती सांगितली. परंतु त्याचा कंटाळा म्हणून नाही! अवीट गोडीचा आहे, नेहमी हवासाच वाटतो! तुमच्या करता कारंजाची कथा सांगतो ऐका" असा प्रस्ताव करून गावकऱ्याने प्रवाशाच्या पथारीवरच आसन, ठोकून कथेला प्रारंभ केला.

"या कारंजाची कल्पना एका कृपणाच्या डोक्यातून निघाली. तो कृपण कृपणपणात, कोणालाच हार न जाण्या इतका, कवडीचुंबक होता! त्याचा धंदा सावकारीचा मुळचा या गावचा नव्हे, लांबून कोठूनतरी, आपले तकदीर भले करण्याच्या इर्षेने या गावी लोटा घेऊन आला म्हणतात. सुरवातीला कुठे चाकरीला राहून, पोटाला चिमटा घेऊन, चाकरीचा पैसा कनवटीला लावीत वर्षा दोन वर्षात, भांडवलवाला झाला! मग दिली चाकरी सोडून नी लागला

व्याजबट्ट्याच्या धंद्याला. वाटेल ती वस्तु घेटा गहाण ठेवी ! अगदी पादत्राणापासून पागोट्यापर्यंत कोणी आणील ती वस्तु, वस्तुच्या मानानं आणा दोन आणे, कर्जाऊ देऊन तो, गहाणदारी करू लागला. हळू हळूं गरजवतांची संख्या वाढून, त्याचा धंदा तेजीत येऊ लागला. उभ्या रात्री कोणाला उसनवारीची गरज लागली तर त्यानी डोळे मिटून या कृपण महाशयाकडे जावं ! अशावेळी, आलेल्या गिऱ्हाईकाची गरज भागविण्याच्या पवित्र कर्तव्याची जाणीव ठेवून, सावकार झोपेच्या सुखावर लाथ मारून आलेल्याची गरज पुरवी ! अर्थात् इतक्या अडचणीच्या वेळी केलेल्या व्यवहारात त्या कुळाच्या नाशाचं बी रुजलेलं असायचं !!

याप्रमाणें धंद्यात हात पाय पसरीत पैं पैं करून सावकारानीं हळ हळं हजारानी मोजण्याइतकी माया केली.

आता, त्याची रहाणी विचाराल तर [illegible] भिकारडी. सावकारीवर केलेली कमाई खर्च करून वाया दवडणें त्याला पापाइतके भयंकर वाटे. कापडाचे गठ्ठे हे ज्या बारदानात गुंडाळून ठेवतात, त्या बारदान्याचेच सदरे तो स्वतःला शिवी ! बारदान्याच्या आतलं कापड वापरणं म्हणजे श्रीमंती चोजले होतं असं तो म्हणे. बाकी कवडीचुंबक राहाणीची त्याला लाज म्हणाल तर बिलकूल वाटत नसे. यापुरता त्याचा प्राजल प्रामाणिकपणा वाखाणण्या सारखाच म्हटला पाहिजे ! आपला जीवनानंद म्हणजे द्रव्यराशी हे तो कबूल करी.

भाजीवाला तो सहसा विकत घेत नसे. घेण्याची लहर आलीच तर शिवराईच्या जुडीकरतां, अर्धा अर्धा तास तो भाजीवालींशी हुज्जत घाली. आणि अखेर. सवदा न पटून तो हातांत काढलेली दिडकी परत कनवटीला लावून आनंदानच घरीं परते.

सावकाराची रसवंती मात्र गुळासारखी गोड. बोलून तो कोणालाच दुखवत नसे! गिऱ्हाईक गरजू असला तरी, गरज आपल्या-लाच असा, नाटकी बहाणा करून तो गिऱ्हाईकाचा मान राखून, अखेर, आपला कार्यभाग साधत असे.

अगदीं क्षुल्लक वस्तुवरही पै पैसा उसनवार मिळू लागल्यामुळे, अडाणी गरिबाचा तो मायबाप होऊन बसला. पुढें पुढें सावकाराचें प्रस्तान इतकं नीट बसलं, कीं, वाटेल तेवढी मोठी रक्कम, क्षणार्धात, खण खण मोजण्याची तयारी गावात त्याचीच एकट्याची आहे असा लौकिक आसपासच्या पंचवीस खेड्यातून पसरला. सावकाराचा कीर्ति--रवि दूरवर किरण फेकू लागला.

गरजवंताचा बाप झाल्यामुळे, व्याजाचा दर जास्त होई तरी, दुप्पटीचा कागद करून घ्यावा लागे तरी, हळूहळू स्थावर मिळकत त्याचे घशात घालावी लागे तरी, सावकार लोकप्रिय झाला! त्याचा तिरस्कार उघड रीतीनें करण्याची छाती कोणाची राहिली नाही !! गरजवंताच्या अकला त्याच्याकडे जणू गहाणच पडल्या होत्या !

तो कमालीचा कवडीचुंबक होता म्हणून सांगीतलच परंतु, त्यानी लग्न केलं. खर्चाच्या पापाला भिणारा हा सावकार नी त्यानी लग्न कर-

ण्याचं पुण्य केलं ! परंतु दैव त्याला अनुकूल म्हणा अगर प्रतिकूल म्हणा लग्न होऊन बरीच वर्षे लोटली तरी, पोर कांही होईना. मूल व्हाव म्हणून त्यानी नवस केले म्हणतात, बाकी नवस प्रत्यक्ष फेडण्याची पाळी येती, तर खर्च करावा लागणार म्हणून प्राणच कंठी आले असते त्याच्या ! नवसाला कोणीच पावला नाही. पोराकरता दुसर लग्न करण्याची कल्पना ही त्याच्या डोक्यात घोळू लागली. तों काय योग सागावा, बिचारी प्रथमपत्नी त्याचं दुःख जाणूनच की काय, वारली ! पडल्या फळाची आज्ञा समजून, सावकार महाशयानी दुसरं लग्न केलं. मूल होण्याच्या आशेला अंकुर फुटण्याचा संभव, दुसऱ्या लग्नामुळें उत्पन्न झाला. परंतु पुत्रप्राप्तीचं सुख उपभोगण्याइतक पुण्य त्याचं नव्हत असं दिसतं. कारण द्वितीय कुटूंबही, प्रथम कुटूंबाइतकच फलदायी ठरल ! मूल होण्याची आशा वाळून अखेर करपून गेली. मग मुलाकरता लागलेली हुरहूर हळूहळू ओसरून, सावकाराचा आनद पुनरपि द्रव्य राशीवर केंद्रीभूत झाला. पैशाच्या साठवणींतच तो सुखसर्वस्व व आयुष्याचं सार्थक समजूं लागला !

सावकाराच्या धंद्याची कृष्णछाया सबंध गावावर पडली ! गरिबाच्या जमीनी तरं, केव्हांच सावकारांच्या नावें झाल्या होत्या, परतु चार दोन, नेकीनी नी कोणाची उसनवारी करावी लागली नाही या आनंदात दिवस काढण्याऱ्या, खाऊन पिऊन सुखी असलेल्या घराण्यानाहीं या सावकाराचे पाय धरावे लागले. सबध गांवाला ग्रासणारा हा राहु, व्यवहारी जगांत, प्रामाणिक, थोर मनाचा. नी बडा गणला जाऊ लागला. ज्याचा पाय दुर्दैवानं सावकाराच्या घरांत शिरला, त्याची बिचाऱ्याची स्थावर मिळकत ही त्याच

पाऊल वाटेने सावकाराच्या घराची वाट चाले. अशा अनेक नागाव-लेल्या गरजवंताच्या अंतःकरणात संतापाच्या आग ऊर्मी उसळत. आणि या लोकांनी मनात सावकाराला वाहिलेल्या शापाच्या प्रभा-वानेच त्याला संतान सुख लाधल नाही असे लोक बोलू लागले. आपले शाप फळाला आले यातच बिचारे समाधान मानीत ! !

लोटा घेऊन आमच्या गावात पोट भरण्याकरता आलेला हा सावकार, अलोट संपत्तीचा मालक बनला. दिवस मावळण्यापूर्वी, काही तरी बाटवा हातात झाला पाहिजे असा त्याचा कटाक्ष असे. आणि ही मनीषा सफल झाल्याचे पाहून, त्याची चर्या समाधानी दिसू लागे. अशाप्रकारे, दुथड्या वाहणाऱ्या, द्रव्य गंगेकडे लोभट नजरेने पाहून संतोषाची ढेकर देत सावकार दिवस व्यतीत करू लागला.

तळपत्या तेजानी, वैभवाच्या ऐटीत, भूलोकावरील प्राण्याना होरपळून काढणारा सूर्यसुद्धा सर्वकाळ, मोगपटावर स्थिर राहात नाही. त्यालाही त्या गादीवरून खाली उतरावे लागते. सावकाराच्या सुखाचा सूर्यही कळसास पोचून तळपत होता. भगवानाच्या डोळ्यात हे वैभव आले म्हणायचे कारण, अचानक रीतीने सावकाराचे द्वितीय कुटुंब हगवणीचे निमित्त होऊन चार तासात सावकाराची सोबत सोडून परलोकी प्रयाण करते झाले !

आणि किती विचित्र योगायोग ! तो व त्याचे जातभाई बायकोच्या प्रेताला, स्मशानभूमीवर, अग्नि देण्यात गुतले तोच, एकाएकी; गावात सावकाराच्या घराने पेट घेतला. सावकार बिचारा

बायकोच्या मरणाची टिर गाळांत, स्मशानभूमीत, तिच शेवटच दर्शन घेण्यात गुतला होता !

आणि इकडे त्याचं घर आगीच्या भडक्यात, स्वाहा होऊ लागलं. आगीची वार्ता, स्मशानात पोचताच सावकाराचं डोकं सुन्न झालं. परंतु प्रसंग ओळखून, बायकोला भडाग्नी देऊन, अग्नीच्या मुखांतून घर, म्हणजेच इतकी वाळगलेली दौलत, वाचविण्याकरता तो पळतच घराकडे परतला. तोपर्यंत गावांत या भयंकर आगीच्या बातमीनं, भडकलेल्या घरासमोर लोकांची गर्दी उसळून, आग विझविण्याचा प्रयत्न चालू झाला होता.

होमकुंडात सापडलेले हे घर भस्मसात् व्हावं असाच विचार क्षितिकाच्या मनाला स्पर्शून गेला असेल. परंतु पेटत्या घरावर पाणी ओतण्यात मात्र कोणीच कसूर करीत नव्हते !

घरातून निघणाऱ्या विराट ज्वाला पाहून, "सावकाराची तर पांचावर धारण बसली ! डोळ्यांदेखत, जीव सर्वस्वाचा होम होत होता ! तो प्रसंग, शत्रूच्याही अंतःकरणात करुणा उत्पन्न करण्याइतका रोमांचकारी । हृदयविदारक होता !

प्रयत्नाची शिकस्त झाली ! परंतु आग आटोक्याच्या बाहेर गेली ! आतल्या सामानातून हाती लागेल ते बाहेर काढण्यात आलं. परंतु नोटांची पुडकी, जमाखर्चाच्या चोपड्या, वचनचिठ्या यांची राख झाली ! हजारो रुपयांचा धूर झाला. आगीच्या डोंबातून निसटून

रोकड रुपये, सोननाणं दुसऱ्यादिवशी हाती लागलं. घर जमीनदोस्त होऊन पायाचा चवथरा मकास मोकळा पडला.

दैवाचा हा प्रहार मर्म भेदीच होता. अनवाणी चालण्याची ज्याला सवय नाहीं त्याला साहारान अनवाणि सोडल्या सारखेच ! नशिबाच्या एका फटकाऱ्यानें, सावकाराची द्रव्य—तृष्णा थंड पडली त्याच्या वृत्तींत पालट झाला. त्या आगीच्या नुकसानीनंतर, लोकाकडून जी सावकारी वसूल येणं होती ती गोळा होऊन पन्नास हजार रुपयेच फक्त त्याची दौलत म्हणून उरले !

ह्या दौलतीचाही त्याला तिरस्कार वाटू लागला. कोणाकरता आपलं आयुष्य आटग, लोकांना नाडवीत, आपली तुंबडी भरीत काढलं ! ह्याची टोचणी त्याला असह्य होऊ लागली. ना पोर ना बायको !

कधीं कधीं वाईटातून चांगलं निष्पन्न होत ! सावकाराची बुद्धि फिरली म्हणजेच, सूख, द्रव्याची रास घालण्यांत नसून त्याचा सात्विक विनियोग करण्यांत आहे अशी खात्री त्याची झाली.

आता एकट्या जिवाला, पैसा किती लागणार ? तेव्हां पाच-पन्नास हजाराची माया ही सुद्धा, कोणाकरता ठेवायची असा विचार करून त्यानीं, उरलेल्या दौलतीची उधळपट्टी परोपकारी कार्यांत करण्याचं ठरवले.

सत्पात्रीं दानाचं महत्व जास्त परंतु कोणाचा सल्ला न घेता, अभिलाषीपणानं जवळचा पैसा खर्चून टाकण्याचे त्याने आपल्या मनाशी ठरवले.

आणि पुन्हा योगायोगाची गोष्ट ! गावात दुष्काळ पडला. दुष्काळीं कामं सरकारनी सुरू करावी म्हणून. पुढारी ओरडूं लागले. ही सुवर्णसंधि समजून, सावकारानें गावातल्या मजुराना दुष्काळी काम म्हणून, ह्या सुंदर कारंजाचं बांध काम काढलं ! काम एकदम सुबक, मनोहर, वठलं पाहिजे हीच त्यांची दृष्टी ! मग त्याकरता पैसा कितीही खर्च होवो ! मजुराना वेतन भरपूर देऊन, त्यांचे आत्मे थंड करून सावकारानी आपल्या, अंतरीचा दाह शमविला ! ज्या कुळाच्या शापानी आपलं सर्वस्व दग्ध होण्याची वेळ आली, त्याची शांति करण्याकरतां शब्दशः पाण्यासारखा पैसा ओतून, त्या एककाळच्या कृपण सावकारानी, हा रम्य सिंह-मुखी जलसिंचनानीं सुखविणारा कारंज, आत्म्याच्या शांतिसाठी निर्माण केला !

कारंज संपूर्ण बांधून झाल्यावर, त्याच्याकडे अतृप्त नयनांनी पहात सावकारांनी काढलेले उद्गार कोणीच विसरणार नाहीं. त्याचें उद्गार हेच " माझा जन्म मी, भल्याबुऱ्या मार्गांनी द्रव्य-संचय करण्यांत घालविला. त्यावेळीं आयुष्यांत त्यासारखं दुसर सुख नाहीं अशीच माझी भावना. मूलबाळ व्हाव अशी हूरहूर काही दिवस वाटलीं. परंतु पुढं द्रव्य तृष्णेंतच आनंद वाटूं लागून, संततीचीही मला पर्वा उरली नाहीं. परंतु अनेकांना दुखवून गोळा करून रचलेल्या द्रव्यराशी ह्या किती क्षणभंगूर आहेत याची प्रचिती, साक्षात् अग्नी

नारायणानीच आणून दिली. जें द्रव्य जमविण्याला मला जन्म घालवावा लागला, त्या द्रव्याचा नाश त्या होमकुंडात एका तासाच्या आत झाला ! या आगीच्या भेसूर दृश्यांनी माझं काळीज चर् झालं. आणि माझ्या हृदयात प्रकाश पडला ! द्रव्य लालसा एकदम ओसरली ! व उरलेला पैसा लोकाकारणी खर्च केल्याविना हृदयाची तळमळ शमेना ! पोराकरता दोन बायका केल्या. परंतु ते सुख लाभलं नाही. दुसऱ्या बायकोचे प्रेत घरातून बाहेर पडलं नी लक्ष्मीच घरातून उडून गेल्याचा दाखला मिळाला ! या माझ्या अंतरीची तळमळ शांत-विण्याकरता मी हा पाणी फेकणारा कारंज बांधला आहे. हेच माझं अपत्य. एका कृपणाचं अपत्य म्हणून लोक याकडे पाहातील. ”

प्रवाशानी, कथा संपताच, ती नवलकथा असल्याची कबुली दिली व खोटेपणाचा आरोप केल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. कारजाच्या जन्माचे रहस्य समजल्यावर प्रवाशानी त्या कारंजाकडे पहाताच त्याच्या डोळ्यापुढे सावकार दिसू लागून त्याच्या मांडीवर खेळत्या मुलाप्रमाणे कारंज मुखावाटे पाणि टाकीत खेळत आहेसे भासलं ! !



# ★ योगायोग ! ★





"सुशिले, राज हे असेंच ना ?" तिच्या सजल नेत्राकडे जरा केविलवाणें पहात मी म्हटलें.

"हं" पदरानें गळणारी टिपे टिपीत सुशीला हलक्या स्वरांत बोलली.

"काय करावें ! माझा हट्ट पुरवावयाच्या गडबडीत मी तुला अगदीच विसरलों. तुझ्या सारख्या हरिणीला व्याघ्रमुखांत लोटून खुशाल चालता झालों."

"हें काय हे ? आपणाकडे काय त्याचें. शिकायची इच्छा पुरी करणं गैर की काय ?" बिचारी माझी समजूत करूं लागली.

"तसे नव्हे. पण मातोश्रींचा स्वभाव ठाऊक, तेव्हां तिचा क्रोधाग्नि भडकवून त्यांत तुझी मात्र आहूती पडण्याची वेळ आली." मी म्हटलें.

आम्ही दोघे विसोबाच्या तळयावर उभे, होतो. प्रभात समयीचा प्रसन्न वायूचा पंखा वृक्षराजी हलके हलवीत होता. पावसाळी दिवस. दाट वाढलेल्या हिरवळीवर प्रातःकालचे दंव बिंदू मोत्या सारखे चमकत होते. अशा या रम्य कालीं, रम्य

ठिकाणी, रमण्या करताच कोणी तरुण तरुणी उभ्या असत्या तर स्वर्ग तेथेच होता. पण—पाण्यात एक पाय व वरच्या पायरीवर दुसरा पाय ठेवून अधोवदनाने अश्रुविमोचन करीत सुशीला उभी होती ! पाण्यात घागर तुमती धरली मात्र होती. पण ती आडवीच पडल्यामुळें पाण्याचा तीन एक थेंबही नव्हता. पण सुशीलेच्या डोळयात मात्र अश्रूंचा पूर लोटला होता. मी वरच्या पायरीवर गुडघा वाकवून तिच्याकडे शून्य वदनाने पहात होतो.

" चल, आण ती घागर तुला भरून वर आणून देतो, म्हणजे दहा बारा पायऱ्या चढण्याचे सायास मी येथे आहे तोवर तरी तुला पडणार नाहीत." मी आडवी घागर तिच्या हातातून सोडवीत म्हणालो.

' नको, राहू दे, भरून नेते मी घागर " असे म्हणत तिने घागर बुडविली. पण तिने भरलेली घागर तिच्या हातातून घेऊन भरकन मी वरच्या चबूतऱ्यावर आणून ठेविली. तीही भिजलेला पदर पिळत पिळत पाठीमागून आली.

" बस आता जरा, जरा बोलून मन मोकळे होऊं दे. मग मी घराच्या त्या कचऱ्याच्या पेटी पर्यंत घागर उचलू लागेन. तेथून ने मग घरात बर का." तिच्या श्रमात वाटेकरी होण्याच्या इच्छेने मी म्हटले.

" कोणी पाहिले म्हणजे "—

" कोणी पहात नाही ! आपल्याला पाहण्याकरता काही कोणी आपले मऊ बिछाने सोडून उठले नाहीत. "—

" नाही. पण ते वामनराव जटाळे ! त्यांची हीच वेळ इकडे परसाकडेला जावयाची. त्यांची बहुधा गाठ "—

" बर बर पडली गाठ तर काय झाल ? ते गावभर टिमकी वाजवितील इतकेच ना. मला आता त्यांचे काहीच वाटनासे झाले आहे. गावकुटाळवयाची तोंड बंद करणे म्हणजे अकाशातून कोसळणाऱ्या सरी अडवून धरण्यासारखेच मूर्खपणाचे आहे ! " तिच्या मनातल भितीचं भूत गाडून टाकण्याच्या बुद्धिने मी म्हटले.

तरुण तरुणीची अशी गाठ पडल्यावर हसण्या मुरकण्याची, गप्पागोष्टीची नी प्रणयचेष्टांची, नुसती गर्दी उसळते असे म्हणतात. पण आम्ही दोघे नुसते अश्रुविमोचना साठीच—जाऊ दे झाल !

तिचा पदर ओढून " हं बैस म्हटलं ना. " असे म्हणत मी तिला बसविले व मीही शेजारीच बसून माझ्या धोतरानी तिच्या गालावरचे दोन थेंब टिपले.

" आपण येथे बसलो खरे पण घरी सासूबाई "

" शेण खात असतील. " मी जरा रागानेच बोललो.

" इश्श हे काय असे भलतच. "

" शेण खात नसतील तर कालवीत असतील सारवणाकरता ! "

" आतां, उठावचं."

. " हो ग उठू आता, आतांच कोठें फटफटावयास लागलें आहे "

" पण आज वनू वन्सना"—

" उठविली पाहिजे. " मी वाक्य पुरें केलें.

" काय हें वेड्यामारखं तरी; त्यांनीं काय केलें आहे. त्याना आज न्हावू घालावयाचें आहे. त्या अजून उठल्यासुद्धा नसतील पण सासूबाईनीं त्याना अंथरुणातून "—

" ओढूनच काढलं असेल नाही." मी थोडा हसत ह्मणालो. " काय हें आईचं करणं ! काही थोडा तरी विचार? आपल्या त्रिंबकात कोण पाऊस ! अक्षय झिम् झिम् सुरूच असून, बिचारा सूर्यसुद्धा ढगाआड दडून असतो. वारं तरी किती झोंबरे सुटतें. त्यांनीं बाहेर पडणं सुद्धां जिवावर येते आणि अशावेळी अगदीं दिसत नाही तोंच तुला तळ्याचें पाणि आणावयास लावावे आणि तेही रोज ! छेः मी तर आता साफच"—

" हं हं. " माझ्या तोंडावर बोटें ठेवत, " असला अघोरपणा नकोग बाई व्हायला. " सुशिला उद्गारली.

" झाला अघोरपणा तर झाला. पुण्यास जाणेचें वेळीं फार्स झाला त्याचीच दुसरी आवृत्ती फार तर निघेल. माझी वृत्तीही त्याबावत आता बेदरकार झाली आहे. " मी तिला निरुत्तर करण्याच्या कल्पनेने बोललों.

" नको बरं तसं पुन्हा ! तेव्हांच जरा अधिक झालं. चार लोक हंसले "—

"आणि त्याचें दात दिसलें दुसरे काय ?" मी समस्या पुरी केली.

" पण आता जाऊंच " असें ह्मणून ती घागर उचलून कटीवर घेणार तोंच ती सहज उचलून " हं चल. घरापर्यंत तर चल नुसती, मग आहेच पुढें आईचें राज्य " म्हणत मी घागर उचलून घराकडे निघालों.

## कथेचें पूर्वसंधान.

बी. ए. ची यात्रा कोठेही न थांबतां पार पडली तर एक तपांत घडते ! मग तिची फलश्रुति मुंबा पुरींत मोठ्या मानमरातबानें उरकण्यात येते हे विश्रुत आहे. अशा ग्रॅज्युएटाना ( गाजर वेटांना ) दिवाळीचाही सण यापुढे फिका वाटतो. तथापि कच्चा बच्चांना घेऊन संसाराचा गाडा हाकणाऱ्याला जशी आगामी दिवाळी आनंदाबरोबर थोडा धसकाही घेउन येते तशीच माझी स्थिति झाली. कानव्होकेशनचा दिवस जसजसा जवळ येउ लागला तसतसा माझ्या हृदयाचा घोरही वाढं लागला. आणि याला कारण, त्या समारंभ पूर्तिसाठीं येणारा वीस रुपयांचा खर्च होय. या वीस रुपयाच्या नोटा आणावयाच्या कशा व कोठून या प्रश्न चिन्हानींच माझें डोकें दुखूं लागलें. प्रत्यक्ष परिक्षेंतील प्रश्न या वरच्या प्रश्नांपेक्षां सोपेच निघतात ह्मणावयाचें !

माझे स्नेही सोबती लवकरच जिवाची मुंबई करावयास मिळणार म्हणून गुलाबी चेहऱ्याने गावभर बेछूट भटकत होते. पण मी मात्र नित्याचे तासभर फिरणेसुद्धा अशा आनंदरावाची गाठ पडेल या भयानें सोडून दिले होते. बी. ए. झाल्यावर आमच्या पुराणाभिमानी वडिलांशी कडाक्याचा खटका उडवून जरा रागारागानेंच मी पुण्य-नगरीस आलो होतो. आता अशा वडिलांच्या चिरंजिवाना बी. ए. तरी कसे होता आले अशी शंका कोणास येईल पण त्याला बरीच कारणें एकत्र यावी लागली. घरची स्थिती पाहू गेलं तर उत्तम नसली तरी समाधानकारक होती. शेती भाती व सावकारी हे आमचे द्रव्य-दाते धंदे. त्र्यंबक क्षेत्रात आमचे घराणे सावकारी करता नावाजलेले होते. आमच्या घरांत सोन्याचे हंडे पुरून ठेविले असावेत असा लोक प्रवाद होता. व कित्येक वेळा जमीन करताना थोडे जास्ती खणून बाबानी प्रवादाचा पडताळा पाहण्याचा प्रयत्नही केला. परंतु इतराच्या घरात निघावी तशीच माती आमच्या घरात निघाली. तेव्हा या हंड्याचे या पापी कलीयुगात कोळसेच होणार असे उद्गार काढून आमचे भोळे धर्मनिष्ठ व कर्मठ बाबा स्वस्थ बसले. मी तर एखादे-वेळीं त्यांना प्रश्नही करी. " जर कोळसे झाले असतील तर ते तरी सापडावेत. मी आपली कोळशाची वखारच घालीन. " यावर " शिंच्याना, कळेना ना नि वळेना ! म्हणे वखार चालवीन ! कोळशा-सारखीच काळी करणी आठवावयास लागली. "---बाबा म्हणत.

हा असा विनोद बाबांशी मी क्वचित् करीत असे. कारण हा विस्तवाशींच खेळ होता. असो. पण पुरून ठेवलेल्या या हंड्यांचा जितका

आह्माला रोजच्या मिटभाकरीला उपयोग झाला तितकाच या आमच्या बऱ्या स्थितीचा व्हावयाची वेळ आली. घरची सुस्थिति असतानासुद्धा मॅट्रिक नंतर या शिक्षणाच्या खर्चिक कारखान्यातून मला काढून घेण्याचाच बाबाचा विचार ! पण लोक, मी मॅट्रिक होण्यापूर्वीच, मी कॉलेजमध्ये जाऊन परिक्षावर परिक्षा देऊन अखेर विलायतेतून बॅरिस्टर होऊन आल्यासारखे माझ्याविषयी बोलू लागले. अर्थात यात थोडी कुचेष्टा असली तरी आह्माला कॉलेजचे शिक्षण घेण्यास ऐपत आहे एवढे लोक निश्चित ओळखीत होते. तेव्हा इतरांना मोठा वाटणारी पैशाची अडचण आपोआप दूर झाली होती.

बाबांनी दुसऱ्या अनेक अडचणींचा खो घालून पाहिला. पण माझे तारेच बळावर होते म्हणून म्हणा किंवा बाबांना काही ग्रह आडवे आले असतील म्हणूण म्हणा नाशिकलाच कॉलेज निघाले. झाले. पोरगा दूर कुठे पुण्यामुंबईला पाठवावयाचे म्हणजे जरा जिवावरच येते असे आमचे बाबा पूर्वी वारंवार म्हणत. अर्थात् ही पुढील शिक्षणबंदीची पूर्व नोटीसच होती. पण बिचाऱ्या दैवानें तिच्यावरही डांबर फासले ! जवळ पैसा, जवळच कॉलेज आणि या शिवाय मीही अडेल तट्टूप्रमाणे न बिचकता, मॅट्रिकच्या बारा वरून टूणकण उडी पहिल्याच वर्षी मारलेली. हा असला त्रिवेणी संगम अलहाबादच्या ऐवजी आमच्या त्रिंबकेश्वरीच झाला तेव्हा त्यातच पुण्य स्नान मला घडले.

मी शास्त्रीबुवाचा मुलगा असून बी. ए. कसा झालों हे सांगण्याकरताच इतका वृत्तान्त सांगावा लागला. पण या गडबडीत कॉनव्होकेशनला जावायची अडचण अणूभर सुद्धा दूर झाली नव्हती.

वकिलीचा माझा अभ्यास करण्याचा हट्ट आमच्या हट्टी बाबानां तर मुळीच पसंत नव्हतां. " झाल हेंच जरा अधिक झालं हें तुला कसं समजत नाही ? आपलं जवळच निघाल कॉलेज म्हणून घातलं त्यांत तुला ? बाकी आपल्याला त्या बी. ए. ची नी फी. ए. ची जरूर काय ? आणि आतां तर त्याच शिक्षणानें हीं अक्कल मिळविलीस वाटत. म्हणे आता पुढें चारच वर्षं आहेत. हुरूपही आहे. होऊन जाईल. ! ! जशी चार वर्षं म्हणजे चार घटका ! तुला मूर्खानंदाला काय कल्पना कवडी कवडी जमविण्याला काय श्रम पडतात ते ? होणार नव्हतास तो झालास बी. ए. पुष्कळ झालें. " बाबाच्या अशा स्पष्ट खडखडीत उपदेशावर माझी तहान मुळीच भागण्यासारखी नव्हती. वकील व्हावें असें माझ्या तर मनाला फार वाटे. तेव्हा माही धीटाईनें बोललो.

" पण मला तर शिकण्याची उत्कट इच्छा आहे. " म्हणत आपलं तुणतुण वाजवीतच राहिलों !

" फिरूना आपलं तेंच. तुला जशी जाण्याची उत्कट इच्छा आहे तशीच मला पण तुला न जाऊं देण्याची आहे. आणि याउपर तुला मी तुझा कोणीच नव्हें असे मानून वागावयाचें असेल तर आपलं स्पष्टच सांगतों की या पुढील शिक्षणाला कवडी मिळणार नाही."

झालं, या बोलण्यानें तर द्रव्यकुंड एकदमच आटलें. पण माझी शिकण्याची उमेद व इच्छा उत्कट असल्यामुळें बाबांच्या रागाला कारण होऊन सुद्धा मी माझ्या पायावर उभा राहून वकील होईल अशी भीष्म प्रतिज्ञा करून गाव सोडलं.

## योगायोग !

कानव्होकेशनला जाण्यात माझा उद्देश जरा निराळा होता. मी त्यावेळी विवाहित होतो इतके सांगितले असता बहुतेक पुरे होईल. लग्नाला वर्षच पुरे झाले होते. तेव्हा माझ्या मनाला तिकडचा ओढा लागून रहावा हे साहजिकच नव्हे काय ? कानव्होकेशन हे पुण्याहून हलावयाला निमित्त मात्र ! बाबाशी भांडून जरा तावा तावानेच तेथून निघाल्यामुळे तिचा नीटसा निरोपही मला घेता आला नाही ! आणि खरे सांगावयाचे म्हणजे यांचीच रुख रुख मला फार लागून राहिली होती. प्रत्येक दिवशी तिची करुण मूर्ति माझ्यापुढे दत्त म्हणून उभी रहात असे. आणि त्यातूनही तिला काट्यावर फेकल्यासारखे वाटून तेच माझ्या मनाला शल्य होऊन राहिले होते. नाजूक फुलाला बळेच काट्यावर फेकुन त्याची परिक्षा पहाण्यात मी निष्टुरपणा केला. असा स्पष्ट कबूली जबाब देतो. प्रेमाच्या राज्यात वास्तवीक हा गुन्हा भयंकर स्वरूपाचा असून याला शिक्षाही तितकीच कठोर आहे. पश्चातापाच्या टोचण्या मला अहोरात्र बोचत होत्या आणि यापेक्षा कठोर तर शिक्षा तरी कोणती कल्पावी ? मातोश्रींचा स्वभाव आता वाचकांना माझ्या प्रमाणेच ओळखला असेल. आणि बाबांच्याही स्वभावाची स्पष्ट कल्पना आता आली असेल. तेव्हा या अशा स्वभावाच्या सासूसासऱ्याची सेवा करीत तिची कालक्रमणा किती सुखाने होत असेल याची मला कल्पनाही सहन होत नसे. आणि म्हणूनच तिच्या भेटीची उत्सुकता तीव्रतर होऊन ही कानव्होकेशनची संधी साधून बाहत्यागंगेत हात धुण्याचा माझा मानस होता. अशारितीने त्र्यंबकास जाण्याचा सुयोग मी घडवून आणिला.

प्रथम वर्णन केलेली आमची तळयावरची भेट झाली त्या दिवशीं श्रावणी सोमवार होता. आमच्या मातोश्री फारच तल्लख, तिखट व तापट ! पण त्यांचा राग त्यांच्याजवळ राहिला असतां तर तो दुसऱ्याला सांगत बसण्याचे कांहीच कारण नव्हते. परंतु वड्याचा राग वांग्यावर आणि पर्यायानें सुशीलेवर नेहमीं निघत असे. आणि सुशीलेचा व माझा कोणता संबंध आहे हे जाणणारा मला तिच्याबद्दल काळजी करतांना पाहून बाईलवेडा ह्मणेल असें वाटत नाहीं. पहाटे फिरावयास जाण्याचा शिरस्ता मी मुद्दामच पाडून ठेविला होता. आणि यामुळेंच तिची व माझी तळयावरती गाठ होऊं शकली. दुसऱ्या दिवशींही मला त्याच क्रमानें तिची भेट घ्यावयाची होती. आजचा मंगळवार हा श्रावणातला शेवटचा. तेव्हां तोच मंगळवार साधण्यासाठीं कितीक जणाची धरपड दिसत होती. आमच्या घरींही माझ्या बहिणीची मंगळागौर होती आणि तिचे हे पाचवे ह्मणजे शेवटचेच वर्ष, तेव्हां मंगळागौर विशेष थाटानें होणार होती. दिवसाच्या काबाडकष्टानीं कोठें गाढ झोंप लागते तोंच झुंजुरत्या पहाटेस उठून कटीवर घागर घेऊन तळयाचा मार्ग धरण्याची सुशिलेला सासूबाईची ताकीद होती. ईश्वराचें भजन गुणगुणत आपल्या मनाला विरंगुळा वाटून ती घेत असे. प्रभातसमयीची गोड भूपाळी गोड गळयावर ह्मणतांना ऐकून मीसुद्धा थोडा भक्तिमार्गाकडे ओढला जात असे.

आज लवकर उठणें मला प्राप्तच होते. कारण तिला तिच्या तळयावरच्या कामाला हातभार लावून दोन प्रेमळ शब्दांनीं तिचें मन आनंदीत करण्याची सुसंधी कोणता रसिक तरुण वायां दवडील ? मी

आज अगदी लवकर उठलों. पण ! पाहतों तर ती घरांत कोठेंच दिसेना. चटकन स्वयंपाकघरात जाऊन डोकावलें तों दिव्याचा मिण मिण प्रकाश व चुल सारवण्याचा खरखर आवाज कानीं पडला. तीच असावी असा तर्क करणार तोंच खोकल्याचा आवाज ऐकून निराशेनें मी तेथून दुसरीकडे वळलों. जरा हिरमुसलाही झालों. इतक्या लवकर उठल्याचें कळूं देऊं नये म्हणून माजरासारखी हळूं पावले टाकीत मी इकडे तिकडे पाहिले. तेवढ्यांत मातोश्री लामण दिवा घेऊन परसाकडेला जाताना दिसल्या. ती स्वयंपाकघरांत कांहीं काम करीत असेल म्हणून मोठ्या आशेनें आंत शिरलों पण छे, कोठेंच कांहीं नाहीं. माझे लक्ष एकदम मोरीकडे गेले. तों तेथें घागर नसल्याचें पाहून ती पाण्याला गेल्याची खातरी झाली.

क्षणाचाही विलंब न करतां मी घाईघाईनें टोपी चढवून कसें तरी वाहणांत पाय घालून फरफटतच कवाड उघडून तळ्याकडे झपझप निघालों. घरापासून तळें एक फर्लांगभर लांब. घरांतून बाहेर पडल्यावर चार टांगा गेलें नाहीं तोंच वळावें लागते. तेव्हां वळणामुळें ती दिसत नसेल असें मनांत म्हणून लांगजंप मारीतच मी ते वळण गाठलें. व मोठ्या आशेनें दूरवर लांब नजर फेकली. पण छे दृष्टीस काय पडले तर एक कावळा. अशुभ पक्षी पाहतांच थोडा संतापलों. पण संतापून काय होणार होते. प्रियेच्या व माझ्या मधले अंतर कदाचित् त्यामुळें वाढलेंच असेल ! शेवटीं थोडा पळत एकदांचा तळ्यापर्यंत येऊन पोहोचलो. चोहीकडे भीषण स्तब्धता ! निसर्गरमणी झोंपेत दंग असावी असें वाटले ! तिचा निद्राभंग करणारा एखादा कर्णमधुर सूर ऐकूं येईल म्हणून कान टवकारलें पण अंह. घागर बुडल्याचा बुडबुड आवाज, नाहींतर घागर

कटीवर चढवताना होणारा पाण्याचा हिमळण्याचा आवाज, नाहीतर उजव्या हातातील आंगठी घागरीवर पडून झालेला मजूळ आवाज, नाहीतर निदानपक्षी पायऱ्या चढण्याचा अगर उतरण्याचा मंद आवाज ह्या इतक्या आवाजातून एकादा तरी आवाज एकू येईल ह्मणून कान देऊन पावले टाकीत होतो. इतके हे विचार मनात येऊन जावयास एक क्षण, एकच क्षण लागला. व तेवढ्यात मी तळ्याच्या चबूतऱ्यावर येऊन धडकलो. खाली पाण्याकडे नजर गेली तो काय! नुसतीच घागर बिचारी आडवी पाण्यावर तरंगत होती! आणि घागर घेऊन येणारी? पोटात धस्स झाले, मन एकदम बावरले. नाडी जलद चालू लागली. दृष्टी कावरी बावरी झाली व शरीराला थोडा कंपही सुटला. तिचे काय झाले असेल याची कल्पना एकदम आली. त्या कल्पनेचा आघातच वज्रप्राय झाला. अशाच भांबावलेल्या स्थितीत पायऱ्या उतरून घागरीजवळ गेलो - तो काय—अहाहा— जिच्यासाठी जीव तळमळत होता ती—ती सुशिला एकदा पाण्याचा तळ काढून वर आली होती. मी देहभान विसरून कपड्यासकट पाण्यात उडी घेतली. पायरीपासून ती फार दूर नव्हतीच. पण त्या अबलेची काय अवस्था? नाकातोंडात पाणी जाऊन जीव घाबरा झालेला. डोळ्याची स्थिती तर वर्णिताच येत नाही. नेहमीचे तिच्या डोळयातील तेजदार पाणी त्या तळ्यातल्या पाण्यात विरून गेले होते. हाय! बेशुद्ध व्हावयाच्या बेताला ती होती. पण मी चटकन तिच्या कटिभागाला धरून तिला पायऱ्याकडे ओढले व मग दोन्ही हातानी उचलून तळ्याच्या चबूतऱ्यावर नेले. होती शुद्धीवर —पण त्या प्राणघातक प्रसंगाने आपण नीट चबूतऱ्यावर असल्याचेही तिला दोन मिनिटे समजलें नाही. दोन मिनिटे

मीही दिङ्मूढच होतो. पण तीच जरा हलक्या आवजांत म्हणाली, " जरा एक पायरी खाली उतरायला गेले तो पायच घसरला. बुळबुळीत पायरी, नाही लक्षात आले. "

स्नानाकरता ती लुगडे घेऊन आलीच होती म्हणून कोरडे वस्त्र निराळे पहावयास लागले नाही. संकटातून मुक्त झाल्यावर कांही वेळ चेहऱ्यावर त्या संकटाच्या छटा अस्पष्ट पण कायम असतात. तिच्या चेहऱ्यावरही त्या भयंकर प्रसंगाचे चित्र स्पष्ट रेखाटलेलें दिसत होतें. निसर्गदत्त रमणीयता पार लोपली किंवा या नवोद्भूत अवस्थेनें ती वाढली हे सांगणे कठीण आहे. प्रेमाच्या भरात प्रिया रडताना सुद्धा प्रियतर वाटते. व रुसलेल्या अवस्थेत प्रियतम सुद्धा वाटते असा रिपोर्ट प्रेमवेडे देतात. परंतु माझ्या प्रत्यक्ष प्रसंगात असा अनुभव मुळीच आला नाही. भीतीनें चेहरा खुलून दिसला असें म्हणण्यात खोटेपणाखेरीज काहीच असणार नाही. असो.

" तळयावरच अंग धूवून ये "---

" मातोश्री म्हणाल्या ना ! छान ! ! "

" तसें काहीं गैरवाजवी नाहीं---सासू—"

" पुरे, पुरें सासूबाईनी इतके चहूंकडून छळवादाचें काटे-टोचले तरी तिच्या धाकानें अजूनसुद्धा तिच्याविरुद्ध तूं ब्र काढीत नाहीत. राक्षसी मनुष्याच्या हाडाचासुद्धा धाक राहतो म्हणतात. सासूबाईची तरफ़दारी मनापासून असेल तर माझ्या गळयात खुळी बायको पडल्याचे

पाहून मला वाईटच वाटावयास पाहिजे. माझी प्रत्यक्ष जन्मदात्री आई. पण मला तिच्या करणीचा तिटकारा वाटतो. वात्सल्य प्रेमाचा पान्हा अनुपमेय आहे असें, आईच्याप्रेमाचें कौतुकानीं वर्णन करतात. परंतु वर्णनाचा खोटेपणा शंभर हिश्शांनीं मला आता पटला आहे. आणि तुला दुसऱ्याच्या मुलीला काय एवढा कळवळा. आजचा कोण प्रसंग. आपलं दैवानेंच खैर केली. " सासूबाईबद्दलची भिती तिनी सोडून द्यावी म्हणून मुद्दाम मी लांब भाष्य केले.

" पण तें लुगडं तेवढं धुतें नी जातें. " मी धरलेला हात हलकेंच सोडून सुशीला म्हणाली.

" जाशील आतां, केवढया पर्वतप्राय प्रसंगांतून निभावलीस. आयुष्याच्या दोरीवर दुष्ट्यमाची सुरी पडलीही. परंतु दोरीच बळकट असेंच आतां दैवाला न मानणारा मी म्हणतो. मी याच क्षणी येथें हजर व्हावे आणि तूंही एकदाच पाण्याचा तळ गांठून त्या तशा स्थितींत वर यावेस सर्वच योगायोग "—

" जाऊं दे आतां बाकी कोणाला कळलेले न बरं." लुगड्याचा ओला गोळा पिळीत पिळीत ती म्हणाली.

' नुसतं पिळूनच घे झालं ! आतां पुन्हा पाय घसरून पडून तर पहा मी काढतो कां ? मग खा गटांगळया नीं प्या पोटभर पाणी. उषः पान करावं म्हणतातच. अनायमाच घडेल. "

" इश्श, भलतीच कांहीं तरी थट्टा. काढलीत ती कांहीं उगीच

नाहींत काढलीत. स्वार्थीबुद्धीनेंच काढली असाल. पुरुषांना स्वार्थ साधु म्हणतात त्याचीच प्रचीती आली म्हणेन. " तिने आपल्या आयुष्यांत प्रथमच इतका धीर करून विनोद केला म्हणायचा !

" असं, आतां आले वाटते रावणाचे बळ." तिच्या विनोदाला, विनोदाची परतभेंट करीत मी म्हटलें.

असा थोडा थट्टा विनोद करीत तिनेंही चटकन लुगडे पिळून घेऊन कळशी कटीवर टाकून घराची वाट धरली. मी फारसा पाठलाग केला नाहीं. पण तिच्याकडे नुसता आशाळभूतासारखा पहात राहिलों. पुनर्जन्मच झालेली ती ! तेव्हां प्रेमाचा धागा जास्तीच चिवट झाला. यात काय नवल. प्रसंगांनीं प्रेम वाढते असेंच म्हणावें लागते. आमची लग्नाची गांठ ही घाई घाईत सुरगाठी इतकी सैल बाधलेली होती. तीच आता सुटण्याची वेळ आली असतां दैवदयेनें पक्की निरगांठ होऊन बसली.

अशा विचाराचा नुसता कल्लोल मनात उडाला होता. प्रभातकाळचा रसिक कवीवर्यांनीं वर्णिलेला मंद मंद वाहणारा झुळझुळ वारा माझी वृत्ती मुळींच उल्हासित करूं शकत नव्हता. जणुं काय झालेल्या प्रसंगानीं आनंदाच्या साऱ्याच वाटा अडवून टाकिल्या होत्या. मनाचा काटा या प्रसंगाच्या धक्यानें फारच ढळला. आणि निसर्ग रमणीय तळयाभोंवती शीळ वाजवीत करमणूक करण्याची आतां मुळींच सोय राहिली नाहीं तेव्हां मीहि माझा मोर्चा विचारानीं भारावलेल्या मनानीं घराकडे वळविला.

## पांढरा चाफा

आजच्या मगळवारचं वर्णन करूं लागावं की लागलीच साऱ्या वर्णनांत मिठाचा खडा पडल्यासारखं वाटूं लागतं. वास्तविक तो खडा न पडल्यामुळें दुधात साखर पडल्यापेक्षाही मला जास्त आनंद वाटत होता. आजचा बायकांचा दिवस. घरात सारंच स्त्री राज्य सुरूं होतं. तो धागड धिंगा पाहून घरात बायकांचे बडच पुकारलें गेल्यासारखें वाटलें. त्या बंडात सामील होण्याचा मान सुशिलेला आज दैवानेंच आणून दिला होता. पण झालेला प्रकार तिला नी मला माहीत. या कानाचं त्या कानाला नाही. वास्तविक नशीबाचा टोला थोडा उलटा लागता तर–तर काय ! कल्पनेच्या कलमानें सुद्धा ते चित्र रंगविण्याचें सामर्थ्य माझ्यात नाही. आनंदाच्या प्रसन्न वातावरणात बुडून गेलेलें ते हसतें बागडतें घर दुःखाच्या गाढ अंधःकारात गाढूनही गेलें असतें. पण-अत्याबाईला मिशा असत्या तर कदाचित् कल्पात सुद्धा आजच प्राप्त झाला असता. म्हणून न घडलेल्या प्रसंगाची भूतें नाचवून वृथा कां शीण घ्यावा. घरात कोणाच्याच मनात दुःखाचा लवलेश सापडत नव्हता. तथापि तिच्या व माझ्या मनातच आनंदाचा अतिरेक झाल्यामुळेच की काय थोडी भीतीची छटा दिसत होती आणि तिची माझी जेव्हा जेव्हा दृष्टादृष्ट होई तेव्हा तेव्हां आमच्यां डोळयातून एकमेकाकडे विशेष अर्थाचे संदेश पोंहचत होते. हा आमच्या दृष्टीतील कल्पनातील गूढपणा कोणालाच समजला नाहीं. आणि यातच आम्हालाही आनंद वाटला. म्हणून वाचकांनाही झाला प्रकार गुप्त राखण्याबद्दल विनवून वाचकांची रजा घेतों.



# परीक्षा झाली !





पुण्य पत्तनांत लोकसागराला तुफान भरती आली होती. दरवर्षी दोन कारणांनी, ह्या वसंत ऋतूंत पुण्य नगरी परस्थांनी फुलून जाते. सरस्वतीचें भूषण अशा पुणें शहरांत मॅट्रिकच्या परीक्षेकरता विद्यार्थ्यांची अलोट यात्रा लोटत असते. आणि, गर्दींत गर्दी, लग्नाकरता येणाचा वऱ्हाडी लोकांची, त्यातंच दाटते ! लकडीपुलावरून फर्ग्युसन कॉलेजकडे जाणारा रस्ता मुलांनी फुलून जातो.

गावांत, लग्नाच्या वाजंत्री, सुस्वर बँड, मनोहर मांडव केळीच्या पानानी शृंगारलेलीं द्वारं, हीं सारीं, विवाहाचीं मंगल चिन्हें नजरेस पडत तर, जिमखान्याकडे, आयुष्याकडे बेपर्वाईने पहाणारे, हसऱ्या चेहऱ्याचे फुलपाखरी--वृत्तीचें, पोषाखी तरुण, मधुन, अधुन विकच्छ थाटाची सुंदर पातळे नेसलेल्या, पाटीवर शेपट्या सोडलेल्या, पावडर लावून बाहेर पडलेल्या युवती भेटत. बिन पैशानीं, करमणूक उपभोगण्याची कोणा कृपणाला इच्छा झाली तर त्यानीं या दिवसांत पुण्यास यावं !

## पांढरा चाफा

पहावे तिकडें उत्साही व प्रसन्न वातावरण, चारी दिशा व्यापून राहिलें होतें. परंतु प्रकाशाजवळच अंधाराची वस्ती आढळते ! या आनंदी वातावरणाची मजा लुटण्याइतकं ज्याचं भाग्य थोर नव्हतं अशाही व्यक्ति भाग्यशाली लोकांच्या गर्दीतच, गरिबी कष्टाचं जीवन जगताना आढळत होत्या.

सदाशिव पेठेत एका जुन्या व पडक्या घरातल्या, लहान खोलीत मायलेक एकमेकांच्या प्रेमळ सानिध्यांत कष्टाळूपणानें, भविष्य-काळावर भिस्त टेवून आयुष्य कंठीत होते. मातेच्या आयुष्यातला, एकमेव आधार तिचा मुलगा, आईला सुखविण्याकरता धरपडत होता. परंतु विद्यार्थी दशेंतला तो चिरंजीव, समजुतदारपणानं वागण्या-पलीकडे काय करू शकत होता ! वारानी जेवून, नीट अभ्यास करून, त्यानी मातेचा, आशादीप तेवत ठेवला होता. यंदाची परीक्षा दिली कीं, शिक्षणाला रामराम ठोकून पोटाकरता नोकरी पहाण्याचा त्याचा निश्चित बेत झाला होता. धुणपाणी करून आईनं नवऱ्याच्या पश्चात् जगण्यांत अर्थ उत्पन्न करणाऱ्या एकुलत्या एक मुलाला जीवापलीकडे जपून लहानाचा मोटा केला होता.

जीवननौका, संकटाच्या तुफानी लाटाची पर्वा न करतां, केवळ पुत्रप्रेमाच्या बळावर, राधाकाकूंनी आजवर धीरानी हाकारली होती. नवऱ्याच्या मृत्यूनीं, अस्मानीचा तारा एकाकी तुटून खाली कोसळावा तसा राधाकाकूच्या भाग्याचा तारा, कोसळला होता. वसंत पण आईच्या आकांक्षा पूर्ण करण्याची उमेद बाळगून, दिवस कंठीत होता. दोन चार दिवसांत वसंताची परिक्षा सुरुं होणार होती. कष्टानी

जोपासना करून वाढविलेल्या रोपट्याचं वृक्षांत रूपांतर होऊन, फळ धरण्या इतकी वाढ त्याची झाली म्हणजे, फळ मिळण्याची आधरता वाढूं लागते. राधाकाकूंनी गेली पंधरा वर्षे, वसंता शिकून मिळविता होण्याची अशा बाळगीली होती. इतका धीर धरल्यानंतर, आता आशा सफळ व्हावयाला अवकाश फारच थोडा उरला होता. तरीही राधाकाकू वसंताच्या परीक्षेबद्दल, उतावळ्या झाल्या होत्या. वसंत परीक्षा उत्तीर्ण होणार याबद्दल मात्र आईच्या मनांत केव्हाच शंका उत्पन्न झाली नाही. !

परीक्षा पास होऊन पाच पन्नास रुपयाची न्वाकरी मिळून, आपल्या आजवरच्या जगण्याची सांगता होणार या गोड विचारांनी अलीकडे राधाकाकू, वसंताचं लाडही करूं लागल्या होत्या. अर्थात् ते लाड गरिबीच्या साऱ्या मर्यादा साभाळून ! आजच त्याना शेजारच्या माईनी थोड भाजणीचं पीठ दिलं होतं. परीक्षा पण वसंताची आजच सुरु झाल्यामुळे तो घाईनं भात खाऊनच गेला होता. संध्याकाळी वसंता आल्याबरोबर त्याला खाण्याकरतां म्हणून राधाकाकूंनी थालीपीठचे दोन वडे लावून ठेवले होते. घासभर भात खाऊन पोर परीक्षेला गेल म्हणून आईच्या ममताळू हृदयाला, वाईटही वाटत होतं. परंतु परीक्षेपुढ जेवण सुचणार नाही याचीही तिला कल्पना होती यामुळेच, परीक्षेचा पेपर देऊन आल्यावर ताबडतोब त्याच्यापुढे थालीपीठाचे वडे ठेवण्याकरता, राधाकाकू वसंताची वाट पहात बसल्या होत्या.

मुलाची मार्ग प्रतीक्षा करीत राधाकाकू, वाती वळीत बसल्या. लक्ष वसंताकडे लागल्यामुळे, वाती एकदम जाड व बोजड तर कांहीं कमालीच्या किडकिडीत होऊ लागल्या. उरलेल्या वेळेचा अडसर दूर होऊन, लेकराची भेट व्हावी म्हणून मातेचे हृदय, जास्तजास्त अधीर होऊं लागले, आणि जेव्हा इच्छित वेळ जवळ यावी म्हणून आपण काळ क्षणानी मोजित राहातो. तेव्हा, ती वेळ लांबतच्च राहून, आतुरतेची परिसिमा होते ! हीच अवस्था राधाकाकूंची झाली.

सध्याकाळ पडूं लागली. राधाकाकूंच्या मनःस्थितीची मुळीच पर्वा न करता, सहस्त्ररश्मी आस्ते आस्ते अंधाराच्या स्वाधीन राज्य-करून, पश्चिम दिशेला, निजधामाची वाट चालत होता. होता होता दशदिशा अंधारात बुडाल्या. राधाकाकूंच्या घरातही अंधार पडला. परतु दिवा लावण्याचे भान त्याना आज राहिले नाहीं ! त्या माऊलीच्या मनांत आशादीप अखड तेवत होता त्यामुळे प्रत्यक्ष अंधेरी नगरी झाली तरी, तिच्या दृष्टीला जणूं अजूनही दिसतच होते !

वसंताचा अद्याप पत्ता नव्हता. आता मात्र मातेचा धीर सुटू लागला व डोळयातही पाणी उभ राहिलं ! व क्षणभरातच, अश्रुंचा पूर सुरू झाला. वसंता एव्हाना यायलाच पाहिजे होता ह्या बद्दल संशयच्च उरला नाही. परीक्षा कितीही वेळ लाबली तरी दिवे लावून रात्रीच्या परीक्षा नसतात हे त्या माऊलीला कळत होतं. त्याचमुळें, दिवसाचे उद्योग थंडावून रस्त्यातून लोकाच्या गर्दीलाही खळ पडत चालल्याचे पाहून, वसंता बद्दलच्या काळजीनं राधाकाकूंच्या काळजात चर्र् होऊन, नाडीचे ठोकेही जास्त पडू लागले. आतुरतेनें वत्साची

वाट पाहून, त्याची परतायची वेळ निश्चित पणानें टळलेली पाहून आईच्या हृदयाला धक्का बसला. भितीनें शरीराला घामही फुटला. नुसत घरांत बसून, उत्कंठा कमी होत नव्हती. उलट क्षणाक्षणाला वाढतच होती. तेव्हां, वसंताच्या शोधाकरतां, कवाड जरास लोटूनच राधाकाकू बाहेर पडल्या. कावरी बावरी नजर टाकून पाडसाला हुंगीत हुडकत जाणारी—वत्सल हरिणीच जणूं !

## लकडीपुलावरचा अपघात.

सकाळची दहा साडे दहाची वेळ. लकडीपुलावरून, विद्यार्थ्यांची नुसती झिम्मड लोटला होती. मॅट्रिकच्या परीक्षेकरतां गांवातली व मुद्दाम त्या करता आलेली परस्थ मुले—मुली, फर्ग्युसन कॉलेजकडे चालल्या होत्या. पैशाच्या दृष्टीनें, सुखी असणारी भाग्यवंत मुलें मोटारींतून जात होती. त्याहून जास्तमुलें सायकलस्वार झाली होती. आणि त्याहून ही जास्त मुलें पायदळ तुकडी सारखी चालली होती ! मोटारीच्या भीतीनीं पायदळ वाल्यांना आपल्या जिवाची काळजी घ्यावी लागत होती. नाहीतर क्षणांत, कांहींच्या कांहीं होऊन बसायचे ! मुलांची गर्दी हळू हळूं वाढतच चालली.

इतक्यांत, ‘ अररर अबबब ’ म्हणून गलबला झाला. एक मुलगी मोटारखालीं अगदीं जाणार इतक्यांत एका तरुणाने, तीराच्या वेगानीं, मुलीला मोटारपुढून, पलीकडे ढकलून दिली ! पोर बचावली. परंतु तिचा जीव बचावणारा तरुण मात्र, मोटारखालीं नेमका सापडून, त्याच्यावरून मोटारचे चाक गेले ! शेवटी अपघात झालाच. फरक इतकाच, मुलीच्या एवजीं एका तरुणा वरती आपत्ती ओढवली !

अपघाताच्या जागीं, मुलाचा घोळका गोळा झाला. ते दृश्य करुणा उत्पन्न करणारे होते. परीक्षेला निघालेल्या एका निष्पाप विद्यार्थ्याच्या अंगावरून चाक जाऊन, तो बेशुद्ध पडला होता. गर्दीतल्याच दोनचार व्यवहारी लोकानी ताबडतोब, त्याच मोटारींत त्या घायाळ तरुणाला घालून, ते लकडी पुलाखालीच असणाऱ्या खाजगी डॉक्टरांकडे, उपचाराकरता, शिरले. अपघाताची जागा पहाण्यांत कुतूहल वाटते. क्षणभर पुलावरचे विद्यार्थी, कोठे चाललो हे विसरुन, त्या अपघाताच्या जागीच गुंगले. परंतु दुःखावलेल्या तरुणाला उचलून नेल्यावर, कुतहलाचा विषयच संपल्यामुळे, विद्यार्थी आपली वाट चालू लागले. नशिबाचा खेळ म्हणतात तो हा ! वर्षभर अभ्यासाचं ओझ शिरावर वाहून आज ते उतर-विण्याकरता, व आयुष्यातला, क्रांतीकारक पल्ला गाठण्याकरता, निघा-लेली मुलाची यात्रा ! त्यांत, पढरीच्या पायापर्यंत पोचण्यापूर्वीच काही लगडे पडतात ! अपघातातला तरुणही, त्याच्या सर्व आकांक्षाना, व कदाचित् महत्वाकांक्षी मनोरथाना मुकला असावा ! परंतु, दुसऱ्याचा जीव बचावण्या करता, आपल्या देहाची पर्वा न बाळगणारा तो तरुण धन्य होय ! परीक्षेचा स्वार्थ, चटकन् सोडून, परोपकार करण्याची आलेली अमोल वेळ त्यानी साधली.

डॉक्टरनीं तात्काळ उपाय सुरू केले. मोटारचा मालक व गाडीहाक्या, अपघाताच्या पापाचे वाटेकरी असल्यामुळें, मुलगा अप घातांत जिवाला मुकला तर त्याच्यावर गुन्ह्याची तोहमत येणार होती. आणि एका निष्पाप तरुण, व आकांक्षेचा अंकूर, नुकताच फुटलेल्या

जीवनाला मूठमाती आपल्या हातून मिळाली याची बोचणी मनाला जन्मभर टोचीत राहणार ? साहाजीकच मुलाचा जीव वाचविण्याची शर्थ करा म्हणून त्यानीं डॉक्टरला अगदी काकुळतीनं सांगीतलं. निर्विकार वृत्तीनं पण धीरानं डॉक्टर उपचारांची शिकस्त करीतच होते.

परंतु, सदिच्छा आणि आशिर्वाद, प्रत्यक्ष जीव बचावण्याच्या कामीं दुबळीच होती. जीवतंतू तुटण्याच्या बेतात आलेला ! त्यात पुनर्जीवन ओतण्याची पराकाष्टा मानवी प्रयत्नानीं चालू होती. तरुणाची मूर्च्छा जाईना. मुलीचा प्राण वाचविता आला याच गोड कल्पनेनें जणू तो गुंगून पडला होता ! समाधानाच्या समाधींत तल्लीन होऊन गेल्यामुळे बाह्यजगाकडे त्याची दृष्टीच नव्हती ! इकडे, हर प्रयत्नानी तरुणाचा कुडीतून पळूं पहाणारा प्राणवायु अवरोधुन पुनश्च, कुडींत खेचून जीवदान दिल्याच श्रेय मिळविण्याकरतां डॉक्टर महाशय धरपडतच होते ! दिवसभर, डॉक्टराच्या दवाखान्यांत आज हीच धामधूम चालू होती. काळ कुणाकरताचं थांबत नाही. थोड्या वेळापूर्वी ऐन माध्यानावर वैभवाच्या शिखरावर तळपणारा, किरण–गोल, आता कलूं लागला होता. व्यवसायात मग्न असल्यामुळें, आपल्याला वेळ कसा पळाला याचं आश्चर्य वाटत असतं. एकाग्रतेनें तनमनधन खर्ची खालून डॉक्टर महाशय आपला पेशंट उठावा, त्यांनी पुन्हा जग डोळे उघडून पहावें या करतां भगीरथ प्रयत्न करीत होते. त्याच्ये पुढें ह्याच ध्येयाचा बिंदू अचल राहिल्यामुळें, सकाळची दुपार व दुपारची संध्याकाळ होऊं लागल्याचे त्यांच्या ध्यानी आले नाहीं.

अभागी युवकाचा घरचा पत्ता न मिळाल्यामुळें, मोटार मालक गाडीहाक्या व डॉक्टर यांना मोठा प्रश्न पडला. क्षणाक्षणाला इह-

लोकाचा संबंध तोडींत तोडींत तरुणाचा प्राण निर्याण मार्गाला लागल्याचे दिसूं लागले. बिचाऱ्याच्या घरच्या लोकाना त्याला डोळे भरून पाहून घेण्याची संधी सुद्धा मिळू नये या, कठोर कल्पनेनी तर त्या सर्वांच्या हृदयांत कालवा कालव होऊं लागली.

अखेर त्या तरुणाच्या मृत्युची लाज वाटूनच कीं काय, किरण-पति सूर्यानी तोंड फिरवलं ! अंधार राज सुरूं झाल. कृत्रिम दिव्यांचा झगझगाट उठावानं दिसूं लागला, डॉक्टरानी आशा सोडलीच होती. त्यांच्या उपचारातला उत्साह मावळूं लागला.—इतक्यांत, एक पोक्त बाई अत्यंत घाबऱ्या मुद्रेनीं दवाखान्यांत शिरली ! वसंताच्या शोधा-करतां बाहेर पडलेल्या त्या राधाकाकू होत्या. आणि तो घायाळ परोपकारी त्यागमूर्ती जीव त्या माउलीचाच पोटचा वसता होता. ! !

मुलाला मरणासन्न अवस्थेंत पाहून मातेनी हृदयविदारक हंबरडा फोडला ! भान हरपून तिनी वात्सल्यपूर्ण नजरेनीं मुलाच्या अंगावर मान टाकली ! आईच्या हृदयांत उठलेल्या करुण वादळाचं वर्णन, लेखणीच्या शक्तिबाहेरचं आहे ! नाममात्र सचेतन मुलाला ती डोळे फाडफाडून बघून हृदयांत साठवूं पहात होती, तोंच नश्वर कुडीचा त्याग करून पोर इहलोक सोडून गेलं ! !

तान्हेलेल्या तोंडाला पाण्याचा पेला लागतों न लागतों तोंच पेला कुणीतरी लवंडावा, शरसंधानाकरतां बाण खेचून धनुष्याला लावतांक्षणीचं धनुष्यच भंगून पडावं, असाच दुर्दैवाचा कठोर प्रहार

मातेच्या मस्तकावर वज्रप्राय होऊन, तिच्या आशा आकांक्षांची, भविष्य काळावरती उठविलेल्या मनोऱ्यांची, राखरांगोळी झाली ! ! भुकेल्या पोराच्या मुखांत, थालीपिटाचा तुकडा देण्याकरतां, वाट पहात बसणाऱ्या मातेच्यापुढं हे ताट वाढून आलं ! कोणत्या पातकाचं हे प्रायश्चित्त, हे भूलोकावरील लोकांस तरी कोडेंच वाटत राहाणार ! !

मॅट्रिकच्या परीक्षेपेक्षा कितितरी अधिक किंमतीची परीक्षा वसंतानी दिली म्हणावयाची ! इतक्या लहान वयांत, दुसऱ्याचा जीव बचावण्याकरतां, आपल्या जिवाची तमा न बाळगणारा तो तडफदार त्यागी तरुण, किंमतच होणार नाही इतक्या मोलाची परीक्षा पास झाला होता !



# ★ भणंग भिकारी ! ★





सायंकाळची वेळ. उन्हाळा नुकताच भासूं लागला होता. त्यामुळे तर मधुन मधुन सुटणाऱ्या वायुलहरी विशेष आल्हादकारक वाटत होत्या. भिकारदासच्या मारुतीवरून पर्वतीकडे अनेक युवयुवतींचे तांडे, खेळीमेळीनें हास्यविनोदाचे फवारे उडवीत चालले होते. त्याच्याकडे पाहून क्षणभर, कोणीही आपले दुःख विसरला असता. मीही त्या तांड्यातलाच एक होतो. परंतु सोबतीला रमणी तर राहीलीच पण फाटका मित्रही नव्हता. कल्पनांची अनेक रम्य कारंजी उडवीत, बेफीकीरवृत्तीनें, सिगारेट फुंकीत मी निघालो होतो. माझ्या आजू-बाजूला, मागेपुढें, भरपूर करमणूक होईल इतक्या भिन्न भिन्न विषयावर वादविवाद चर्चा, थट्टामस्करी चाललेली ऐकू येत होती. या रंगीबेरंगी पोषाकी तरुणतरुणींच्या गर्दीत माझं लक्ष एकदम दोन व्यक्तींनं वेधलं. त्या व्यक्ती स्त्रीपुरुष होत्या. नवराबायकोच असावीत असं वाटत होत पण—परस्परांना उपयोगी पडण्याकरतांच ते सहचारी असावेत असच मला तरी वाटलं. कारण ते भिकारी होते. यावेळी आपल्या आनंदाचा भंग होऊ नये म्हणून, भिकाऱ्यानी थोडा आग्रह धरला तर त्याच्या हातांत तांब्याचा पैसा लोक टाकीत. तेव्हा धंद्याच्या दृष्टीनें ही वेळ व हें स्थळ उत्तम होतं याच जाणीवेनें ते

भिकारी-जोडपं त्या गर्दीतून वाट काढून आपल्या नेहमीच्या बैठकीकडे जात असावे.

पुढारलेल्या मताचे युवक आपल्या सोबतीणीला घेऊन घटकाभर मौज करण्याकरता, सनातन्याची कीव करीत, पर्वतीकडे निघाले असतील. लग्नापूर्वी सहवास असावा, त्या सहवासात आवडी निवडी, स्वभावधर्म एकमेकाना पटून, त्यातून, प्रेमफलाचा उद्भव होऊन मग त्याची परिणती म्हणजे जन्माची गाठ घालण्यात व्हावी. असे विचार सुधारणावादी आजकाल प्रतिपादीत आहेत. याही पुढची मजल गाठलेले प्रेमवीर तर, पटेल तोवर नवराबायकोच्या नात्यानं नांदाव, न पटेल त्या दिवशी दोघानाही दाही दिशा मोकळ्या असाव्यात असें उदार मत प्राजलपणें फैलावित आहेत. जीर्ण सनातनीं मतं पाश्चिमात्य शिक्षणाच्या झंझावातान पार उडविली जातात. म्हणूनच अशा शिक्षणाशिवाय मतांत क्रांती होऊ शकणार नाही असा एक (गैर) समज समाजांत आढळून येतो.

पण याचा फोलपणा सिद्ध करायला त्या भिकारी जोडप्याकडे बोट केलं तरी पुरे आहे ! त्या जोडप्याचे विचार किती पुढारलेले ? सहवासाशिवाय आंधळेपणानें जन्माची गाठ बांधणे त्याना शुद्ध वेडेपणाचे वाटत असावे. म्हणूनच प्रत्यक्ष सहवासाचं सूख आज ते उपभोगीत होते. आणि सहवासातच सुखाची सीमा समाधान साधल्याचं असेल तर प्रत्यक्ष गाठ बांधण्याची तरी जरूरी कोठे उरते ? लग्नाचे विधि उरकणं हा एक देखावा आहे. प्रेमतंतूनी जे बांधले गेले त्यांच्या पदरा-उपरण्याची गाठ न बांधली तर काय बिघडतं ? इतकं उच्च

तत्वज्ञान त्या भिकारी-जोडप्याच्या प्रत्यक्ष कृतींत उमटलेलं दिसत ! आतां सांगा शिक्षणाचा गंधही नसतां, इतक्या पुढारलेल्या मतांचा प्रचार नुसत्या तोंडानीं न करतां कृतीनी करणारं ते दांपत्य काय दर्शवितं ?

मला तर खरं लिहायच म्हणजे त्या भिकाऱ्यांचा हेवा वाटला. कितीही मनधरणी केली, तरी लग्नाची बायको नवऱ्याबरोबर फिरायला जावयास अद्याप तयार होत नाहीं. पतिराज सुशिक्षित कितिही असोत, पण त्यांनाही बायकोच्या जुनाट मतांची कोळिष्टिक झटकतां येत नाहींत. ही जोडी पहावी तों, मन मोकळेपणानें, कृत्रीम लाजेला मूठमाती देऊन संसार-शकट भर रस्त्यावर हसऱ्या चेहऱ्यानी हाकीत होती ! याला शिक्षणाचा आधार लागला काय ?

आणखीही विचाराचा एक धागा बाहेर पडला. आधुनिक पोषाकाची सजावट पहा. स्त्रियांच्या पोषाकांत, कापडाची काटकसर हेच एक मध्यवर्ती सूत्र दिसून येतं. हाताच्या बाह्या फाजील लांब करून कापड वाया घालविणं आज कोणाला रुचत नाही. बाही आखूड होतां होता आतां, बिनबाह्यांचीं ब्लाऊझ निर्माण झाली आहेत ! याहि सुधारणंत मघाच जोडपं, पावडरी लावणाऱ्या, अद्यावत् नटलेल्या नटीला हार जाणार नाही. इतकंच काय तर, हीच कापडाची बचत आणखी करून, बाह्या तर नाहींच पण आणखीही काही भाग नसलेला ब्लाऊझ त्या भिकाऱ्याच्या रमणीचे अंगावर आढळेल ! याही सुधारणेला शिक्षणाचा आधार लागला नाहीं !

## भणंग भिकारी

जों जों विचार करूं लागलों तों तों पुरोगामी आत्यंतिक सुधारणावाद्यांची मतं कृतीनें प्रतिपादणारे खरे पुढारी म्हणजे हे भणंग भिकारी असेच पटूं लागले !

आणखी एक सुधारणा घ्या. जुन्या पद्धतीने, चारीबांजूनं बंदोबस्त करून सूर्यकिरणांचा प्रवेश न होईल अशी बंदिस्त कोठडी, बाळंतीणीची खोली म्हणून राखून ठेवलेली असते. आधुनिक आरोग्यविज्ञान याच्या उलट सल्ला देते. भरपूर सूर्यप्रकाश व हवा खेळत राहील अशीच खोली बाळंतपणाकरतां योग्य होय. असें आतां आम्ही म्हणून लागलों आहोत. आज भिकाऱ्यांची बाळंतपण कोठे होतात याचा विचार करा ! हवेला व उजेडाला मुळींच बंधन न घालता अगदी उघड्यावर, झाडाखालीं थोड्या अडोशाला सुखप्रसूती झाल्याची अनेक उदाहरणें तुम्हाला भिकारी स्वानुभवाची म्हणून सागतील. !

सूर्यस्नानाची महतीही पाश्चिमात्य लोकांनी इतकी गायली आहे कीं, दिवसांतून काहीवेळ, विवस्त्र राहून सूर्यप्रकाशाखालीं असून सनबाथ घेण्याची प्रथा तिकडे प्रचारांत येऊं लागली आहे म्हणतात पण मी म्हणतों याही गोष्टीकरतां पाश्चिमात्यांकडे तोंड वेंगाडण्याची पाळी आपल्यावर खास आलेली नाहीं. कारण हा भिकारी- वर्ग रोज दिवसभर सूर्यस्नान जवळ जवळ विवस्त्र स्थितींत घेत आहे. !

थोडक्यांत म्हणजे बऱ्याच नवमतांचं जिवंत चालतं बोलतं प्रतीक म्हणजे रस्त्यावर बेछूटपणें भटकणारे भणंगभिकारी होतं ! आतां, कांहीं जुन्या मतांची जपणूकही त्यांनीं कसोशीने केल्याचे आढळून

येते. उदाहरणार्थ परमेश्वरार्चाच गोष्ट घ्या. त्याच अस्तित्व चटकन कबूल करण्याची आजच्या बुद्धिप्रधान व तर्कनिष्ठ तरुणाची तयारी नाही. वाद घालता घालता, अगदीच वेळ पडली तर इश्वर ही एक शक्ती आहे येवढच ते कबूल करतील ! हा नास्तिक पथ हळू हळूं वाढत्या प्रमाणावर असून बाळस धरू लागला आहे. अशा वेळी इश्वराचं अस्तित्व त्याच्या नामाचा गजर करुन, टाहो फोडून भिकारी प्रतिपादीत असतात !

परमेश्वराचं नाव हेच तर भिकाऱ्याच भाडवल ! पोटाकरता, त्याना देवाचा आधार घ्यावाच लागतो. नास्तिक भिकाऱ्याला उपाशी मराव लागेल. कारण मग कोणाच्या नावान भिक्षा मागावयाची हा अवघड प्रश्न त्याच्यापुढं उभा राहील.

पढरीचा विटोबा हा भिकाऱ्याचा मायबाप म्हणावयाला हरकत नाही. पुष्कळ भिकाऱ्याचा पोटाचा प्रश्न ‘ विटोबाच्या ’ नावानें सुटलेला आहे ! विटोबाच्या खालोखाल त्याच्या पत्नीचा आधार घेणारे भिकारी सापडतील. पण बहुधा त्या दोघाच्या जोड--नावावर गुजरण करणारा भिकारीवर्गच फार मोटा आढळेल.

या जोडीच्या नतर आधाराला घेतले जाणारे म्हणजे ‘ राम-नाम. ’ जणू रामाला खुष करण्याकरता त्याच्या सितामाईचही नाव सहजी यावं म्हणून मोठ्या युक्तिन ‘ सिताराम ’ ह्याच नावानं रघुपति-ला आळविण्याची पद्धत भिकारी लोकात पडलेली दिसते ! मात्र शंकराच्या नावावर पोट भरणारा भिकारी फारसा दिसावयाचा नाही.